# अनुक्रमणिका

प्रस्तावना ६

प्रकरण १ - इस्लामी समाजजीवन आणि विवाह ८

१. समाजजीवनाचा उद्देश ८
२. इस्लामी समाज आणि लैंगिक गरज ९
३. व्यभिचार मुक्त शुद्ध समाज ९
४. व्यभिचाराच्या निर्भर्त्सनेचा इतिहास, चिकित्सा आणि व्यभिचाराविरुद्ध इस्लामी उपाययोजना ११
५. इस्लामी समाजात विवाहसंस्थेचे महत्त्व १५

प्रकरण २ - विवाह आणि महर १८

१. इस्लामी पुरुषप्रधान संस्कृतीचे नैतिक सामर्थ्य १८
२. विवाहप्रसंगी 'महर'चे महत्त्व १८
३. 'महर' निश्चित करताना मध्यममार्ग स्वीकारणे २०
४. मुस्लिमांच्या मातांचा महर २०
५. महर फातमी २१
६. महरनिश्चितीस परस्परांची संमती आवश्यक २२
७. मिस्ल महर २३
८. 'महर' बाबत स्त्रीला पूर्ण स्वातंत्र्य आहे २३
९. महरची रक्कम पूर्णपणे स्त्रीच्या मालकीची मालमत्ता असते २४
१०. इस्लाममध्ये स्त्रीचे महत्त्व २५

प्रकरण ३ - 'जहेज' देण्याची प्रथा २६

१. 'जहेज' शब्दाचा परिचय २६
२. 'जहेज' चे विविध प्रकार २६
३ 'जहेज'च्या पहिल्या प्रकारासही इस्लाममध्ये स्थान नाही २७
४ 'जहेज'चा दुसरा प्रकार ३१
५. हुंड्याच्या प्रथेच्या उद्गमाचा शोध ३२

प्रकरण ४ - हुंड्याच्या प्रथेचे ऐतिहासिक अध्ययन आणि हिंदू समाज ३३

१. हुंड्याच्या प्रथेचे ऐतिहासिक अध्ययन ३३
२. हिंदू धर्म आणि स्त्री ३३
३. हिंदू समाजात हुंड्याची आवश्यकता ३५
४. पुराणामधील हुंडा ३६
१) पार्वतीचा हुंडा ३६
२) द्रौपदीचा हुंडा ३६
३) राजा विराटच्या मुलीचा हुंडा ३६
४) सुभद्राचा हुंडा ३६
५) सीतेचा हुंडा ३७
६) सत्याचा हुंडा ३७
५. प्राचीन हिंदू समाजात स्त्रियांची परिस्थिती ३८

प्रकरण ५ - हिंदू समाजात हुंड्यामुळे घडणारे अत्याचार ३९

१. स्त्रीविषयक तत्त्वज्ञान आणि दृष्टिकोन ३९
२. मनुस्मृतीचा कायदा ४०
३. आधुनिक भौतिकवादी हुंड्याची प्रथा ४१
४. हुंड्यासाठी स्त्रियांवर होणारे अत्याचार ४२
५. एक धोकादायक प्रवृत्ती ४३
६. स्त्रीभ्रूण हत्या ४४
७. गर्भपात ४४

प्रकरण ६ - मुस्लिम समाजात हुंड्याच्या प्रथेचा शिरकाव (कारणमीमांसा) ४६
१. इस्लामची स्त्रीविषयक विचारसरणी ४६
२. प्रथेस अंमलात आणणारे लोक आणि कारणमीमांसा ४८
१) भारतीय समाजाची स्वभाववैशिष्ट्ये ४८
२) सूफी संत आणि धर्मप्रचार ४८
३) धार्मिक पुस्तकाची उणीव ५०
४) हिंदू समाजाचा प्रभाव ५०
५) सभ्यता आणि प्रतिष्ठेच्या मूळ कसोट्यांतील लक्षणीय बदल ५१

प्रकरण ७ - हुंड्याच्या प्रथेस इस्लामी न्यायशास्त्रात म्हणजे शरीयतमध्ये स्थान आहे काय? ५३

१. नैतिकता आणि सामाजिक परंपरा ५३
२. हुंड्याचा (जहेजचा) पहिला प्रकार ५४
३. हुंड्याचा (जहेजचा) दुसरा प्रकार ५४
४. हुंड्याची प्रथा : माणुसकीचा अपमान ५४
५. मुलीला तुच्छ समजणे ५५
६. अनुचित अत्याचार ५५
७. स्त्रीविषयक असंस्कृत विचार रोखणे ५६
८. हुंडा घेणे हा तर दरोडेखोरीचाच एक प्रकार ५७
९. स्त्री-पुरुष अनैतिक संबंधांचा उद्भव ५७
१०. हुंड्याची प्रथा विवाहातील मोठे विघ्न ५८
११. हुंड्यामुळे स्वार्थी समाजाची निर्मिती ५८
१२. ही तर बांडगुळी वृत्ती ५९
१३. निषिद्ध माल कमविण्याची प्रवृत्ती हुंड्याची प्रथा एक कारण ५९
१४. समाजात असमतोल निर्माण होणे ६०
१५. हुंड्याच्या प्रथेचे चुकीचे समर्थन करणे पाप आहे ६०
१६. इस्लामी शरीयतशी (न्यायशास्त्राशी) बंडखोरी ६१

प्रकरण ८ - सुधारक आणि व्यवहारी उपाययोजना ६२

१. हुंडा प्रतिबंधक उपाययोजना ६२
२. विद्वानांची जबाबदारी ६२
३. स्त्रियांमध्ये जागृती निर्माण करण्याची आवश्यकता ६२
४. तरूणांमध्ये स्वाभिमान आणि स्वावलंबनाची भावना निर्माण करावी ६२
५. मुस्लिम संघटनांची जबाबदारी ६३
६. धार्मिक संस्थांचे कार्य ६३
७. तात्कालिक हुंडाविरोधी सुधारक योजना ६३
८. मुस्लिम समाजाची बेपर्वाई विनाशक असेल ६४

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# प्रस्तावना

"इस्लामी समाजजीवन व्यवस्था आणि हुंड्याची प्रथा" हे छोटेखानी पुस्तक आपल्या दृष्टीसमोर आहे. विवाह विधी संपन्न झाल्यानंतर वधूला वरगृही पाठविताना तिला तिच्या मातापित्यांनी काही घरगुती संसारोपयोगी साहित्य भेट म्हणून देण्याची प्रथा भारतातील मुस्लिम समाजात रूढ आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांची कन्या फातिमा (रजि.) यांना वरगृही पाठविताना काही मोजके संसारोपयोगी साहित्य दिले गेले होते. त्या घटनेत या प्रथेचे तथाकथित मूळ आहे. अगदी मोजके संसारोपयोगी साहित्य देण्यास मुस्लिम विद्धानांनी योग्य ठरविले असले तरी या व्यवहारात नेहमी संयम पाळण्यात यावा, मध्यममार्ग स्वीकारण्यात यावा, तसेच वधूपित्याच्या आर्थिक स्थितीपेक्षा जास्त भार कदापि टाकण्यात येऊ नये, असा उपदेशही मुस्लिम विद्धानांनी केला आहे.

मला दक्षिण भारतात काम करण्याची संधी मिळाली. त्या वेळी त्या भागात हुंड्याची आणखी एक प्रथा चालू असल्याचे आढळले. त्या प्रथेचे मूळ फक्त गैरमुस्लिम समाजामध्ये दिसून येते. सामान्य मुस्लिम या लांच्छनास्पद रूढीपासून मुक्त आहेत. या प्रथेनुसार वरपिता एखाद्या मुलीशी आपल्या मुलाचे लग्न करण्यासाठी मोठ्या रकमेची मागणी करतात. वधूपित्याला या मुलाशी लग्न लावून देण्यासाठी ही रक्कम देण्याचा करार करावा लागतो, जणू मुस्लिम मुलींचा दर्जा गुराढोरांपेक्षा कमी झाला आहे. कोंबडी बाजारात कोंबडीची किंमत घेतल्याशिवाय कोंबडी व्यापारी खरेदीदाराच्या हाती आपली कोंबडी देत नाही. परंतु येथे तर वरपिता मागेल ती रक्कम देऊन आपली मुलगी वरपित्याच्या स्वाधीन करण्यास वधूपिता विवश होतो. मुस्लिम मुलींचीही दुर्गती आणि त्यांच्या आईवडिलांची लाचारी अत्यंत दयनीय आहे. तथापि याबाबतीत दया करणारा कोणीही आढळत नाही हेही दुःखदायक आहे. परिणामत: या हुंड्याच्या प्रथेमुळे हजारो-लाखो मुली लग्न न जमल्यामुळे वयाच्या या स्तरावर येऊन पोहोचतात की, त्या वयात लग्न करण्याला मुळीच अर्थ राहत नाही. मुस्लिम मुलींची ही परिस्थिती पाहून प्रत्येक संवेदनशील आणि सहानुभूती बाळगणारा खवळून उठेल. दक्षिण भारतातील अनेक लोकांशी याबाबतीत मी चर्चा केली. हुंड्याच्या या प्रथेचा सर्वजण धिक्कार करताना दिसतात. परंतु हुंडा घेण्याची संधी स्वत:वर येते, तेव्हा तो घेण्याचे कोणीही टाळत नाही. उलट जास्तीतजास्त हुंडा उकळण्याचा प्रयत्न करतात. अल्लाह अशा गोष्टीपासून आम्हा सर्वांना वाचवो!

ही परिस्थिती समोर आल्यामुळे या समस्येवर विस्तृत चर्चा व्हावी असे वाटू लागले. जेणेकरुन काही संवेदनशील लोकांचा स्वाभिमान जागृत व्हावा आणि समाजातील तरूणांमध्ये स्वावलंबनाची जाणीव निर्माण व्हावी आणि त्यांनी स्वार्थावर आधारित खोट्या प्रतिष्ठेपासून स्वत:चा बचाव करावा. या उद्देशाने या समस्येवर जे लिहिण्याची ईशकृपा होऊ शकली ती आपल्यासमोर आहे. अल्लाह करो हा प्रयत्न निष्फळ होऊ नये, इतकेच नव्हे तर ज्या हेतुने हा प्रयत्न केला गेला आहे, तो हेतु सफल व्हावा.

- उमर हयात खान गौरी

भोपाळ, २८ मे १९८५

प्रकरण १

# इस्लामी समाजजीवन आणि विवाह

इस्लाम ही एक परिपूर्ण जीवनव्यवस्था आहे. मानवी जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रासाठी इस्लाम व्यापक आणि परिपूर्ण मार्गदर्शन करतो. समाजजीवन हे मानवी जीवनाचे अतिमहत्त्वाचे क्षेत्र आहे. या क्षेत्रासंबंधीसुद्धा साध्या सामाजिक समस्यांपासून जटिल समस्यांपर्यंत सर्व बाबींसंबंधी मूलभूत सिद्धान्त आणि नीति-नियमांद्वारे इस्लाम परिपूर्ण मार्गदर्शन करतो.

## १. समाजजीवनाचा उद्देश

समाजाची सुरूवातच एक पुरुष आणि एक स्त्री यामधील परस्पर संबंधातून होते. या दोघांची निर्मिती एकाच जीवापासून करण्यात आली असून या दोघांच्या निर्मितीचा उद्देश मानवी वंशाची सातत्याने निर्मिती व्हावी हा आहे, असे इस्लामने पहिल्यांदाच सांगून टाकले आहे.

म्हणून आज्ञा केली गेली आहे -

"लोकहो! आपल्या अल्लाहचे भय बाळगा ज्याने तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले आणि त्याच जीवनापासून त्याचे जोडपे बनविले आणि एकाच जोडप्यापासून समस्त पुरुष व स्त्रिया जगात पसरविल्या." *(दिव्य कुरआन, ४:१)*

स्त्री आणि पुरुष ही एकाच जिवाची दोन रूपे आहेत, असे स्पष्टपणे पवित्र कुरआनच्या उपरोक्त आयतमध्ये सांगितले आहे. मानवी वंशाची वृध्दी आणि त्याचा उत्कर्ष सातत्याने व्हावा असा दोन्ही जिवांच्या निर्मितीचा हेतुही त्यात स्पष्ट होतो. या निर्मितीच्या आणखी एका उद्देशाचे वर्णनही करण्यात आले आहे :

"तो अल्लाहच आहे ज्याने तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले व त्याच्याच जातीपासून जोडी बनविली म्हणजे तिच्या सान्निध्यात संतोष प्राप्त करावा."

*(दिव्य कुरआन, ७:१८९)*

पवित्र कुरआनच्या उपरोल्लेखित दोन्ही आयतींचे बारकाईने चिंतन केल्यास असे दिसून येते की, स्त्री व पुरुषाची मानवी जोडी (दांपत्य) तयार करण्याचे दोन उद्देश आहेत. या दांपत्याच्या साह्याने मानवी वंशाचे अस्तित्व टिकून राहावे हा एक उद्देश आहे. या स्त्री-पुरुषाच्या जोडीला म्हणजे दोघांना एकमेकांपासून संतोष, समाधान आणि मन:शांती प्राप्त व्हावी हा दुसरा उद्देश आहे. दुसऱ्या उद्देशाचे मनन केल्यास या उद्देशामुळे पहिल्या उद्देशाची परिपूर्ती होते असे दिसून येते. दुसऱ्या उद्देशपूर्तीमुळे जीवनसंघर्ष सुलभ होण्यास मदत होते. शिवाय अपत्याचा जन्म आणि त्याचे पालनपोषण, संगोपन इ.सुद्धा दांपत्याला अप्रिय न होता आनंददायक ठरते आणि वरील दोन्ही उद्देशांची परिपूर्ती होऊन हेतु सफल होतात.

## २. इस्लामी समाज आणि लैंगिक गरज

इस्लामने मानवी लैंगिक प्रवृत्तीला नैसर्गिक गरज प्रमाणित केले आहे. त्यास दाबून टाकण्याचा किंवा त्यास पूर्णपणे प्रतिबंध लावण्याचा सल्ला इस्लाम देत नाही किंवा त्यास दुगुर्णही ठरवित नाही. उलट मानवाने या आपल्या नैसर्गिक आवेगाला योग्य दिशेने वाव देऊन त्यापासून समाधान प्राप्त करण्याचे त्यास साधन बनविण्याची पूर्ण अनुमती देतो. तथापि मानवी जीवनातील इतर नैसर्गिक प्रवृत्तींप्रमाणे याही प्रवृत्तीस इस्लाम मुक्त आणि अनियंत्रित होऊ देत नाही. मैदानातील पाण्यास अस्ताव्यस्त चोहीकडे वाहू देऊन त्याचा नाश होऊ देण्याऐवजी त्यास ठराविक दिशेने, योग्य मार्गाने जाऊ दिल्यास त्याचा तलाव किंवा नदी बनू दिल्यास ते पाणी समाजोपयोगी होते. त्याप्रमाणे मानवाच्या लैंगिक प्रवृत्तीस काही मर्यादा घालून योग्य रितीने त्याचे निरसन होईल अशी व्यवस्था इस्लाम करतो, जेणेकरून मानवाला त्यापासून समाधान प्राप्त व्हावे आणि समाजस्वास्थ्य टिकावे. परंतु त्यामुळे समाजातील कोणाही व्यक्तीच्या हक्कास बाधा पोहोचू नये याची इस्लाम पुरेपूर दक्षता घेतो.

## ३. व्यभिचार मुक्त शुद्ध समाज

समाज व्यभिचारमुक्त राहावा म्हणून मानवाच्या या नैसर्गिक लैंगिक प्रवृत्तींचे समाधान विहित मार्गाने करून घेण्याची अनुमती इस्लाम देतो. इतकेच नसून त्यास प्रोत्साहनही देतो. तथापि लैंगिंक संबंधाच्या स्वैराचारास निषिद्ध ठरवितो. जगातील इतर समाजांत फक्त बलात्कारास गुन्हा ठरविला जातो. तथापि हेच कृत्य दोघांच्या संमतीने घडले असेल तर गुन्हा घडल्याचा प्रश्नच त्या समाजात उद्‌भवत नाही. परंतु इस्लामने व्यभिचारासच गुन्हा ठरविला आहे. मग तो दोघांच्या संमतीने असो व नसो. म्हणून इस्लामने व्यभिचाऱ्यांना अद्दल घडविणारी शिक्षा निश्चित केली आहे. या जबरदस्त शिक्षेच्या भीतीमुळे हा गुन्हा करण्याची हिंमत कोणी करू नये म्हणून पवित्र कुरआनात आदेश दिला गेला आहे :-

"व्यभिचाराच्या जवळपासही फिरकू नका, ते फार वाईट कृत्य आहे आणि अत्यंत वाईट मार्ग."

*(दिव्य कुरआन, १७:३२)*

व्यभिचारास निर्लज्जपणा आणि अतिवाईट मार्ग ठरविल्यानंतर त्यास गुन्हा ठरवून त्याची शिक्षासुद्धा निश्चित केली आहे.

"व्यभिचारी स्त्री आणि व्यभिचारी पुरुष या दोहोंपैकी प्रत्येकास शंभर फटके मारा त्यांची कीव करु नका. अल्लाहच्या धर्माच्या बाबतीत जर तुम्ही सर्वश्रेष्ठ अल्लाह आणि अंतिम दिनावर श्रद्धा बाळगत असाल आणि त्यांना शिक्षा देते वेळेस श्रद्धावंतांचा एक समुह उपस्थित असावा."

*(दिव्य कुरआन, २४:२)*

इस्लामच्या दृष्टीने व्यभिचाराचे कृत्य किती मोठा गुन्हा आहे हे पवित्र कुरआनच्या वरील आयतीचे निरीक्षण केल्यास दिसून येते. येथे व्यभिचाराकरिता दोघांची संमती असण्या-

नसण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. शिवाय व्यभिचाराची ही शिक्षा तुरुंगाच्या चार भिंतीआड दिली जात नाही. जाहीर घोषित करून सार्वजनिक ठिकाणी जनतेसमोर ही शिक्षा दिली जाते, जेणेकरून अशा व्यक्ती ओळखल्या जाऊ शकाव्यात आणि जनतेमधील ज्यांच्या मलीन अंत:करणातसुद्धा असा गुन्हा करण्याची प्रवृत्ती असेल, त्यांनी ही शिक्षा पाहून बोध घ्यावा आणि त्यांच्यातील ती हीन प्रवृत्ती नाहीशी व्हावी. अविवाहितांनी केलेल्या व्यभिचाराच्या गुन्ह्याकरिता पवित्र कुरआनच्या वरील आयतीद्वारे ही शिक्षा निश्चित केली आहे. विवाहित जोडप्यांपैकी एखाद्या व्यक्तीने व्यभिचाराचा गुन्हा केल्यास त्या व्यक्तीस दगडांचा मारा करून ठार मारण्याची शिक्षा निश्चित करण्यात आली आहे, हे हदीस आणि इस्लामच्या इतिहासाच्या अभ्यासातून माहीत होते.

इस्लाम आपल्या समाजाला व्यभिचारी पुरुष आणि व्यभिचारी स्त्रियांपासून शुद्ध ठेवू इच्छितो, असे याबाबत अस्तित्वात असलेल्या अनेक हदीसवरून दिसून येते. इस्लाम समाजामधील मानवाच्या क्षुद्र आणि नीच भावनांवर नियंत्रणे घालतो, त्यावर बंदी आणतो आणि त्या समाजासमोर अतिनिर्मल आणि उच्चतम उदात्त जीवनध्येय ठेवतो, जेणेकरून पवित्र समाज निर्माण व्हावा. लोक व्यभिचार करीत राहावेत, त्या गुन्हेगारांना कोडे मारले जात राहावेत आणि त्यांच्यावर दगडांचा वर्षाव करून त्यांना ठार मारले जात राहावे, या गोष्टींची इस्लामला मुळीच आवड नाही. या उलट विवाहाच्या उचित मार्गाने लैंगिक वासनेची परिपूर्ती करणे सुलभ व्हावे, आणि व्यभिचाराकडे वळणे अतिकठीण व्हावे अशी परिस्थिती निर्माण करण्याची आवश्यकता इस्लामला वाटते. हा उद्देश सफल व्हावा म्हणून इस्लाम एकीकडे तरूण मुला-मुलींना विवाह करण्यास प्रोत्साहन देऊन विवाहास अतिसुलभ बनवितो, तर दुसरीकडे व्यभिचाराच्या कृत्यास इतका व्यापक अर्थ दिला आहे की, त्यामुळे व्यभिचारापर्यंत पोहोचण्याचे सर्व मार्ग बंद होतात. कामवासनारूपी सैतानास सुरुवातीसच योग्य ठिकाणी अडविले जाते. त्यामुळे सैतानाच्या या गुन्ह्यास प्रवृत्त करू देण्याच्या प्रवृत्तीचे समूळ उच्चाटन केले जाते.

ज्या हदीसद्वारे व्यभिचाराच्या कृत्याची व्यापकता दाखविली गेली, ती हदीस खालीलप्रमाणे आहे :-

"कामवासनेच्या भावनेने परव्यक्तीस (परस्त्री किंवा परपुरुष) पाहणे हा दृष्टीव्यभिचार आहे, त्याच भावनेने परव्यक्तीचे बोलणे ऐकणे हा कर्णव्यभिचार आहे, वासनामय हाताने एकमेकांस स्पर्श करणे हा हस्तव्यभिचार आहे. परव्यक्तींनी एकमेकांशी अश्लील संभाषण करणे हा वाचाव्यभिचार असून व्यभिचाराच्या उद्देशाने एकमेकांकडे चालत जाणे हा पादव्यभिचार आहे. मनात कल्पनेने एकमेकांशी संभोग करणे हा मनाचा व्यभिचार आहे. या सर्वांमुळे लैंगिक अवयव उद्दीपित होतात."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

या विस्तृत व्याख्येवरून व्यभिचाराची व्याप्ती लक्षात येते. या सर्वांपासून बचाव करण्याचा इस्लामने आदेश दिला आहे. तसे केल्यास व्यभिचाराचे समूळ उच्चाटन होऊ शकते.

यानंतर शुद्ध चारित्र्याच्या बक्षिसाचे वर्णन केले आहे :-

"जो कोणी आपल्या जीभेचे (उक्ती) आणि लैंगिक अवयवाच्या रक्षणाचे मला वचन देईल, त्यास स्वर्ग मिळण्याची जबाबदारी मी घेतो." (हदीस : बुखारी)

## ४. व्यभिचाराच्या निर्भत्सनेचा इतिहास, चिकित्सा आणि व्यभिचाराविरुद्ध इस्लामी उपाययोजना

व्यभिचाराच्या निर्भत्सनेसंबंधी ऐतिहासिक चिकित्सा आणि व्यभिचाराविरुद्ध इस्लामी उपाययोजनेबाबतची चर्चा करताना अल्लामा सय्यद अबुल आला मौदूदी लिहितात -

"व्यभिचाराच्या अर्थाशी सर्वजण परिचित आहेत. एक पुरुष आणि एक स्त्री यांच्यामध्ये पती आणि पत्नीचे सनदशीर नाते (वैवाहिक) नसताना त्या दोघांनी संभोग करणे असा व्यभिचाराचा अर्थ आहे." व्यभिचार हे दुष्कृत्य आहे, धार्मिक दृष्टीने ते पाप आहे, सामाजिकदृष्ट्या लज्जास्पद आणि निषेधायोग्य वाईट कृत्य आहे, असे प्राचीन काळापासून आजपर्यंत सर्व मानवसमाजाने मानलेली बाब आहे. तथापि वास्तवात काही इतर समाजातील लोकांनी आपली बुद्धी कामवासनेच्या अधीन केली आहे किंवा त्यांनी मनाच्या या विकृतीला तात्त्विकतेचा साज चढविला आहे, त्यांचा आजपर्यंत कोणीही निषेध केलेला नाही, विरोधही केलेला नाही. या विश्वव्यापी बाबीचे कारण हे आहे की, खुद्द मानवी स्वभावात व्यभिचारास प्रतिष्ठा असावी अशी एक कुप्रवृत्ती असते. मात्र स्त्री आणि पुरुष केवळ कामवासनातृप्तीसाठी एकत्र आले तरी त्यांना एकमेकांपासून अलग होण्याचे स्वातंत्र्य असू नये, यावरच मानवजातीचे अस्तित्व आणि मानवी संस्कृतीची उभारणी अवलंबून आहे. यासाठी स्त्री आणि पुरुष या मानवी जोडप्यांचे आपापसातील संबंध चिरस्थायी, दृढ वचनबद्ध आणि एकनिष्ठेने मजबूत बांधलेले असावेत. या संबंधास समाजाची मान्यता प्राप्त होण्यासाठी ते समाजाला माहीत होणे आवश्यक आहे. या सर्व बाबींशिवाय मानवी वंश एक दिवससुद्धा टिकू शकणार नाही. कारण मानवी अपत्याला आपले जीवन जगण्यासाठी, योग्य पालनपोषण होण्यासाठी, मानसिक आणि सांस्कृतिक विकासासाठी कित्येक वर्षांपर्यंत त्रासदायक देखभाल आणि संगोपनाची आवश्यकता असते. त्यास संरक्षणाचीही गरज असते, त्याचप्रमाणे त्यास शिष्टाचार, सभ्यता शिकविणे यासाठी त्यावर सुसंस्कार करण्याची आवश्यकता असते. या सर्व बाबींची सुरूवात अपत्याच्या जन्मापासून होत असते. म्हणून केवळ कामवासनातृप्तीसाठी स्त्री व पुरुष एकत्र येऊन नंतर ते एकमेंकापासून वेगळे झाल्यास पुरुषाच्या मदतीशिवाय केवळ एकटी स्त्री या सर्व गोष्टींचा भार पेलू शकणार नाही. यासाठी विवाहसारख्या दृढ करारबद्धतेशिवाय मानवी समाज आणि संस्कृती स्थिर आणि जिवंत राहू शकत नाही. कारण संस्कृतीचा जन्मच मुळी एक पुरुष व एक स्त्री कायमस्वरुपी एकत्र राहण्यावर, एक घर, एक वंश अस्तित्वात आणण्यावर, नंतर भिन्न वंशाच्या दरम्यान नातेसंबंध आणि प्रेमसंबंध जुळण्यावर अवलंबून असतो. जर स्त्री आणि पुरुष घर आणि वंशनिर्मितीस वगळून केवळ संभोगाची मजा लुटण्यासाठी स्वैरपणे एकत्र येऊ लागले, तर सर्व मानवजात विस्कळीत होईल. मानवाच्या सामुदायिक जीवनाचे मूळच छाटून टाकले जाईल,

सामाजिक जीवनाचा पाया शिल्लक राहणार नाही, मानवसंस्कृतीची इमारत ढासळून पडेल. म्हणून स्त्री-पुरुष संबंध एकमेकांच्या एकनिष्ठेवर कटिबद्ध नसतील. ते संबंध समाजास अनभिज्ञ असून त्यास समाजमान्यता प्राप्त नसेल. असे स्त्री-पुरुषाचे स्वैर संबंध मानवी समाजधारणेस घातक असतील. याच कारणास्तव सर्व युगांमध्ये, बहुतेक सर्व समाजांत हा एक निर्दयी घातक आणि मोठा दुराचार समजला गेला आहे. सर्व धार्मिक परिभाषेतसुद्धा ते पाप समजले गेले आहे. म्हणून प्रत्येक युगात प्रत्येक समाजाचे विवाहसंस्थेच्या उभारणीबरोबरच व्यभिचारास सक्त बंदीसाठी कोणत्या ना कोणत्या स्वरुपात निश्चित उपाययोजना करण्याचे प्रयत्न केले आहेत. तथापि काही संस्कृतींमध्ये व्यभिचारास कमी-अधिक नुकसानकारक समजले गेले आहे. काही ठिकाणी व्यभिचाराचे परिणाम अस्पष्ट भासत आहेत. काही ठिकाणी त्याच्या परिणामांची इतर समस्यांशी गुंतागुंत झाली आहे. परिणामस्वरुप व्यभिचाराविरुद्ध उपाययोजनेतील विविध कायदे, सदाचार-दुराचाराच्या व्याख्या, त्यासंबंधी धार्मिक आणि सांस्कृतिक व्यवस्थेत तफावत दिसून येते.

तथापि इस्लाम मानवसमाजास व्यभिचाराच्या धोक्यापासून वाचविण्यासाठी केवळ कायद्यानुसार शिक्षा देण्यावरच विसंबून राहत नाही. उलट व्यभिचार घडूच नये म्हणून मोठ्या प्रमाणावर विविध प्रकारे प्रतिबंधक सावधगिरी बाळगण्याच्या तरतुदी करतो. कायद्यानुसार (शरीयतनुसार) केली जाणारी शिक्षा हा अंतिम उपाय म्हणून योजला जातो. लोक गुन्हे करीत राहावेत आणि गुन्हेगारांना खांबांना बांधून कोडे मारण्याचे रात्रंदिवस चालू राहावे, असा इस्लामचा उद्देश नाही. उलट लोकांनी व्यभिचाराचे गुन्हे करूच नयेत आणि त्यासाठी त्यांना शिक्षा देण्याचा प्रसंगही येऊ नये असा इस्लामचा उद्देश आहे. सर्वांत प्रथम कामवासनेला योग्य वळण देण्याची सुधारणा इस्लाम करू इच्छितो. त्यासाठी मानवाच्या मनात सर्वशक्तिमान अल्लाहाची आणि परलोकाची भीती निर्माण केली जाते. 'कयामत' म्हणजे जगाच्या अंताच्या दिवशी मानवाकडून घडलेल्या सर्व गुन्ह्यांबद्दल विचारले जाण्याची जाणीव करून दिली जाते. गुन्हे माणसाच्या मृत्यूनंतरही त्याचा पिच्छा पुरवतात, असा विश्वास ठेवणे श्रद्धेसाठी आवश्यक बाब ठरविली गेली आहे. माणसामध्ये ईश्कायद्याचे पालन करण्याची भावना निर्माण केली जाते आणि ही बाबसुद्धा श्रद्धेसाठी आवश्यक ठरविली आहे. बलात्कार आणि व्यभिचार हे महापाप असल्याचे माणसाला सांगून त्याला सावधान केले जाते. या महापापाबद्दल अल्लाह सक्त विचारणा करील, याची त्याला वारंवार आठवण करून दिली जाते. ही पार्श्वभूमी तयार केल्यानंतर विवाह केल्यामुळे किती सुविधा निर्माण होतात, हे सांगितले जाते. विवाह केल्यास दांपत्यास, आनंद, सुख, समाधान आणि मनशांती लाभू शकते. या बाबींचा लाभ व्हावा असे पवित्र कुरआनातील अनेक आयतीद्वाराही सांगण्यात आले आहे. एका पत्नीमुळे समाधान न झाल्यास चार चार स्त्रियांशी विवाह करून सनदशीर मार्गाने प्रेमसंबंध जोडण्याची काही अटींसह संधी उपलब्ध आहे. पतीपत्नी संबंधात बिघाड निर्माण झाल्यास पुरुषाने तलाक (पतीने पत्नीस दिलेला घटस्फोट) देण्याची आणि पत्नीने खुलअ (पत्नीने पतीस दिलेला घटस्फोट) देऊन एकमेकांपासून विभक्त होण्याची संधी प्राप्त असते किंवा

दांपत्यामध्ये बेबनाव असेल, तर घराण्याच्या पंचायतीसमोर किंवा शासकीय कुटुंबन्यायालयासमोर येऊन आपापसात समझोता करण्याचा प्रयत्न करता येतो. समझोता होऊच शकत नसले, तर शेवटचा उपाय म्हणून एकमेकांपासून रीतसर विभक्त होऊन आपापल्या मर्जीनुसार आवडीच्या व्यक्तीशी दुसरे लग्न करता येते. मात्र कोणत्याही परिस्थितीत पुरुष आणि स्त्री यांनी अविवाहित राहणे इस्लामला पसंद नाही. एवढेच नव्हे तर दास (गुलाम) आणि दासींनासुद्धा अविवाहित राहू देऊ नये, असे इस्लामचे आदेश आहेत. त्यामुळे समाजघटकांत व्यभिचाराची इच्छा निर्माण होण्यास, प्रवृत्त होण्यास, संधी प्राप्त होण्यास कोणतीही सबब उरणार नाही. व्यभिचाराच्या शिक्षेचे वर्णन करण्यापूर्वी पवित्र कुरआनातील 'सूरह अहजाब'मध्ये (एका अध्यायामध्ये) व्यभिचारास प्रतिबंध व्हावा, म्हणून काही उपाय सुचविण्यात आले आहेत. घरातून बाहेर पडण्यापूर्वी स्त्रियांनी चादरी ओढून घूंगट घेण्याचा आदेश देण्यात आला आहे. मुस्लिम स्त्रियांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या घरातील आदर्श असलेल्या स्त्रियांप्रमाणे शालीनतेने आणि आनंदाने घरी राहावे. स्त्रियांनी आपले सौंदर्य, शरीर आणि शृंगाराचे इतरांसमोर प्रदर्शन करू नये. एखाद्या परपुरुषाने एखादी वस्तू मागितल्यास, ती पडद्याआडून द्यावी, असा उपदेश करण्यात आला आहे. हे आदेश खासकरून पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या घरातील स्त्रियांना देण्यात आले होते. त्याचे तंतोतंत पालन त्याकरीत होत्या. मुस्लिम श्रद्धावान स्त्रियांसमोर अज्ञानकाळातील निर्लज्ज स्त्रियांचा आदर्श नव्हता तर खुद्द पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या स्त्रिया आणि मुली यांचे अनुकरणीय आदर्श नमुने त्यांच्यासमोर होते. हा आदर्श पाहून सर्व श्रद्धावान स्त्रिया त्यांचे अनुकरण करीत असत. इतर सर्व श्रद्धावान मुस्लिम स्त्रियांनी या आदर्शाचे अनुकरण करावे अशी इस्लामची अपेक्षा आहे, आदेश आहे. गुन्हेगारी कायद्याअंतर्गत शिक्षा निश्चित करण्यापूर्वी स्त्री आणि पुरुषांनी एकत्र मिसळण्याची प्रथा बंद करण्यात आली. शृंगार केलेल्या स्त्रियांना घराबाहेर येणे बंद करण्यात आले. व्यभिचारास सहज आणि सुलभ करणारे सर्व दरवाजे बंद करण्यात आले. पवित्र कुरआनातील 'नूर' नावाच्या अध्यायातील आदेशानुसार, अश्लीलता प्रकटनाससुद्धा बंदी करण्यात आली. वेश्या व्यवसायही इस्लामी कायद्याने बंद केला. स्त्रिया आणि पुरुषांवर पुराव्याशिवाय व्यभिचाराचे आरोप करण्यास आणि त्याची चर्चा करण्यास कडक शिक्षेची तरतूद करण्यात आली. पुरुषांनीसुद्धा आपली दृष्टी अधोमुखी (नजरा खाली झुकविणे) ठेवण्याचे आदेश देऊन दृष्टीवर पहारेकरी बसविले, जेणेकरून पुरुषांना स्त्रियांकडे टक लावून सौंदर्योपासना करीत प्रेमाचे चाळे करण्याची संधी प्राप्त होऊ नये. स्त्रियांनी आपल्या घरातील 'महरम' आणि 'नामहरम' पुरुषाशी (ज्याच्याशी लग्नसंबंध होऊ शकत नाही असा तो 'महरम' पुरुष आणि ज्याच्याशी लग्नसंबंध होऊ शकतो तो 'नामहरम' पुरुष) वागताना तारतम्याने शिष्टाचाराच्या मर्यादा पाळाव्यात. 'नामहरम' पुरुषासमोर शृंगार करून येऊ नये. व्यभिचाराची संधीच मिळू नये याकरिता सर्व उपाययोजना प्रथम केल्या गेल्या, तद्नंतर व्यभिचारासाठी कायदेशीर शिक्षा निश्चित करण्यात आल्या. चारित्र्यसुधारक अंतर्बाह्य सर्व उपाय योजूनसुद्धा वासनांध दुष्ट लोक धर्मानुकुल सनदशीर मार्ग सोडून धर्मसंमत नसलेल्या अयोग्य मार्गाने आपली वासनापूर्ती करण्याचा हट्ट

करतात, त्यांची चामडी सोलून काढण्याची शिक्षा देऊन अशा व्यभिचाऱ्यांच्या वासनांचे दमन करण्यासाठी त्यांच्यावर सामाजिक शस्त्रक्रिया करून अशा लंपटांना समाजातून कापून टाकून समाजातील घाण काढून टाकली जाते. ही शिक्षा केवळ लंपटांना यातना देण्यासाठीच नसून अशा शिक्षेद्वारे समाजातील सर्वांना संदेश दिला जातो की, मुस्लिम समाज म्हणजे लंपटांसाठी मौज-मजा करण्याचे सहलस्थान नाही, जेथे व्यभिचारी स्त्री-पुरुषांनी चारित्र्याची होळी करून मौज करत हुंदडत राहावे.

याप्रमाणे इस्लामने आपल्या अपेक्षित समाजास व्यभिचाराच्या निर्भर्त्सनेपासून शुद्ध ठेवण्यासाठी शक्य ते सर्व प्रतिबंधात्मक उपाय योजले आहेत. व्यभिचाराच्या गुन्ह्यासाठी जेथे इस्लामने अविवाहित पुरुषास शंभर कोडे मारण्याची शिक्षा निश्चित केली, तेथे विवाहित व्यभिचारी पुरुषासाठी दगडांचा मारा करून ठार मारण्याची शिक्षा निश्चित केली. याबरोबरच व्यभिचारापर्यंत जाणारे सर्व मार्ग सक्तीने बंद केले. या लांच्छनास्पद दुष्कृत्याचा आरंभ मनातील अभिलाषेने सुरु होतो. डोळे कामवासनेच्या आगीच्या ज्वाला भडकविण्याचे कार्य करतात. हातपाय इच्छित उद्दिष्टाच्या निकट पोहोचवितात. तदनंतर या लज्जास्पद गुन्ह्याचा पडाव येतो. या पडावापर्यंत पोहोचण्याचे सर्व मार्ग बंद करून व्यभिचारापासून समाजाला शुद्ध ठेवण्याचे इस्लामचे ध्येय आहे. प्रत्यक्ष व्यभिचार घडण्यापूर्वी त्यासाठी व्यक्तीचे डोळे, कान, नाक, हात, पाय आणि मन मदत करीत असतात. म्हणून व्यभिचाराची प्राथमिक तयारी करणाऱ्या या सर्व अवयवांच्या दुरुपयोगाला इस्लाम नापसंद ठरवितो, त्यास मनाई करतो आणि त्यास पाप ठरवितो. अशा तऱ्हेने व्यभिचाराचे समूळ उच्चाटन इस्लाम करतो. याच उद्देशाने स्त्री-पुरुषांना एकत्र मिसळण्यास, फिरण्यास इस्लामने बंदी घातली आहे. हाच हेतु सफल करण्यासाठी स्त्रियांच्या कार्यक्षेत्राची लक्ष्मणरेषा घराच्या चार भिंतीच्या आत मर्यादित केली आहे. शिवाय स्त्रियांना बुरखारूपी मजबूत किल्ल्यात पोहोचवून त्यांच्या सौंदर्याचे प्रदर्शन करण्याच्या शक्यतेला संपवून टाकण्यात आले आहे.

समाजाला विशिष्ट आकार देण्याच्या वास्तव ध्येयामुळे व्यभिचाराविरुद्ध इस्लामची इतकी सक्त वागणूक आहे. इस्लाम एक सतप्रवृत्त आणि न्यायी समाजाची निर्मिती करू इच्छितो. त्या समाजात कोणत्याही व्यक्तीवर कोणत्याही प्रकारे बळजबरी होऊ नये. व्यभिचार बळजबरीने होवो किंवा न होवो या दुष्कृत्यात स्त्रीवर नेहमी अन्याय होतो. त्यामुळे समाजात स्त्रीचीच बेइज्जती होते, तिलाच कलंक लागतो, तिचे शील चक्काचूर होते, ती शीलभ्रष्ट होते. एकदा समाजात तिची बेइज्जती झाली की, तिला समाजात स्थान राहत नाही. जगातील इतर काही समाजांत व्यभिचाराच्या गुन्ह्यास फक्त पुरुषाला जबाबदार धरले जाते. जर स्त्रीची संमती असेल तर अशा व्यभिचारास गुन्हाही समजला जात नाही. अलीकडेच अमेरिकेत एका वृद्ध गृहस्थाने एका वृद्ध स्त्रीविरुद्ध न्यायालयात व्यभिचाराचा दावा दाखल केला होता. पुरुष शीलभ्रष्ट होतच नाही, असा अमेरिकन न्यायालयाने

निर्णय दिला, म्हणून दावा फेटाळण्यात आला. तथापि इस्लाममध्ये व्यभिचाराच्या गुन्ह्याबद्दल स्त्री व पुरुष दोघांना जबाबदार धरण्यात येते. म्हणून दोघांना शिक्षा करण्याचे ठरविण्यात आले आहे. परंतु बळजबरीने व्यभिचार केला गेला असेल, तर स्त्रीला सवलतीस पात्र ठरविण्यात आले आहे. व्यभिचाराचा गुन्हा सक्तीने हाताळत असतानासुद्धा खासकरून स्त्रीला आणि विशिष्ट परिस्थितीत पुरुषालासुद्धा शारीरिक बळजबरीमुळे निर्भर्त्सनेपासून संरक्षण दिले आहे.

## ५. इस्लामी समाजात विवाहसंस्थेचे महत्त्व

व्यभिचार घडू नये म्हणून इस्लाम वरीलप्रमाणे प्रतिबंधात्मक उपायांची योजना करतो. तद्नंतर बुरखारूपी मजबूत किल्ल्यात असलेल्या स्त्रीपर्यंत पुरुषाने राजेशाही थाटात प्रवेश करण्यासाठी विवाहाचा मार्ग खुला ठेवतो. जेणेकरून ज्या पुरुषास जनानखान्यात प्रवेश करण्याची इच्छा असेल त्याने केवळ ह्याच राजमार्गाने प्रवेश करावा. विवाहानंतर दांपत्याने लैगिंक संबंधाद्वारे आनंद उपभोगावा आणि वंशवृद्धीही करावी. तथापि इतर धर्माप्रमाणे केवळ वंशवृद्धी हाच हेतु विवाहित संबंधाचा असावा हे इस्लामला अभिप्रेत नाही. दांपत्याने सुख, समाधान आणि आनंदाने जीवन व्यतीत करावे हा इस्लामचा मुख्य हेतु आहे. त्यामुळे समाजाचा मूळ घटक असलेल्या कुटुंबात स्थैर्य प्राप्त होईल. तथापि लग्नानंतर एकमेंकांशी पटण्याची सुतराम शक्यता नसेल, तर पुरुषाने तलाक (पुरुषाने दिलेला घटस्फोट) द्वारे आणि किंवा स्त्रीने खुलअ (स्त्रीने दिलेला घटस्फोट) द्वारे परस्परापासून विभक्त होऊ शकतात आणि दोघेही आपआपल्या पसंतीनुसार विवाहाद्वारे दुसरा घरोबा करु शकतात. इस्लाममध्ये ही तरतूद स्पष्ट आहे. एक स्त्री पुरेशी होत नसेल तर एका वेळी चार स्त्रियांशी विवाह केल्यास इस्लाम ते सहन करू शकतो. तथापि कोणत्याही परिस्थितीत विवाहबाह्य लैंगिक संबंध इस्लाम सहन करत नाही. म्हणून पवित्र कुरआनातील अनेक आयतींमध्ये विवाह करण्याचा उपदेश केला आहे. समाजातील वयात आलेल्या कोणत्याही पुरुषाने अथवा स्त्रीने अविवाहित राहू नये यासाठी प्रयत्न केले गेले आहेत, प्रोत्साहित केले गेले आहे. इतकेच नव्हे तर विधवा स्त्रीस दुसरे लग्न करण्याची प्रेरणा दिली आहे.

"आणि त्या स्त्रियादेखील तुमच्याकरीता निषिद्ध आहेत इतर कोणाच्या विवाहबंधनात असतील (मुहसनात) परंतु अशा स्त्रियांशी (विवाह करण्यामध्ये) त्या स्त्रिया अपवाद आहेत ज्या (युद्धामध्ये) तुमच्या हाती लागलेल्या असतील हा अल्लाहचा कायदा आहे ज्याचे पालन तुमच्यावर बंधनकारक आहे. याच्याखेरीज इतर ज्या स्त्रिया आहेत त्यांना आपल्या संपत्तीद्वारे प्राप्त करणे तुमच्यासाठी वैध करण्यात आले आहे परंतु अट अशी आहे की त्यांना विवाहबंधनात सुरक्षित करा असे नव्हे की तुम्ही स्वच्छंद कामतृप्ती करु लागाल. "

*(दिव्य कुरआन, ४:२४)*

विवाह ही एक दृढ प्रतिज्ञा आहे :-

"तुम्ही ते कसे घ्याल जेव्हा तुम्ही एक दुसऱ्यापासून सुखोपभोग घेतला आहे आणि त्यांनी तुमच्याकडून दृढ वचन घेतले आहे?"

*(दिव्य कुरआन, ४:२१)*

विवाह हे एक हेतुपूर्वक कार्य आहे :-

"तुमच्या स्त्रिया तुमच्यासाठी शेती (तुमचा वंशवृद्धी करणाऱ्या जननी) आहेत. जेव्हा तुमची इच्छा होईल तेव्हा (वंशवृद्धिच्या भावनेने) तिच्याकडे जा. परंतु भविष्याची काळजी घ्या आणि ईश्वरी कृपेचे भय बाळगा." *(दिव्य कुरआन, २:२२३)*

इस्लामी समाजात, पुरुषांनी स्त्रीशिवाय जीवन जगण्यास ठरवून, त्यांना विवाह करण्याचा आदेश दिला आहे :-

"तुमच्यापैकी जे लोक अविवाहित असतील आणि तुमच्या दास–दासीपैकी जे सदाचारी असतील त्यांचे विवाह करुन द्या. जर ते गरिब असतील तर अल्लाह त्यांना आपल्य कृपेने श्रीमंत बनविल" *(दिव्य कुरआन, २४:३२)*

विवाहासंबंधी उपरोक्त अर्थाच्या आणखी अनेक आयाती पवित्र कुरआनात आल्या आहेत. पैगंबर मुहम्मद (स.) यांनीही आपल्या अनेक हदीसद्धारे विवाह करण्याची ताकीद केली आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एका हदीसद्धारे आदेश दिला आहे, "विवाह करावा असे माझे मार्गदर्शन आहे. जो माझ्या मार्गदर्शनानुसार वागत नाही, तो माझा नाही." दुसऱ्या एका हदीसमध्ये आदेश आहे, "अविवाहिताच्या नमाजापेक्षा विवाहिताची नमाज अधिक श्रेष्ठ असते". आणखी एका हदीसचे निवेदन आहे, "इस्लामला अविवाहित राहणे मान्य नाही." दुसरे एक निवेदन आहे, "या जगाच्या सर्व मालमत्तेत, सदाचारी पत्नी सर्वश्रेष्ठ मालमत्ता आहे." माननीय अनस (रजि.) यांनी निवेदन केलेल्या हदीसमध्ये सांगितले आहे, "जो पवित्र व शुद्ध होऊन अल्लाहला भेटू इच्छितो त्याने लग्न करावे." माननीय अबू जर (रजि.) आणि माननीय अकाफ बिन तमीमी (रजि.) निवेदन करतात की, त्यांना पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "विवाह करण्याचे तुमचे सामर्थ्य असूनसुद्धा तुम्ही विवाह करीत नसाल तर तुम्ही सैतानाचे बांधव आहात,... तुमच्यासारख्या वाईट लोकांचा मृत्यूही अतिवाईट असतो. तुम्ही सैतानाला संधी का देता? त्याचे (सैतानाचे) सर्वश्रेष्ठ शस्त्र स्त्रिया आहेत." माननीय अनस (रजि.) यांनी आपल्या निवेदनाद्धारे सांगितले आहे, "ज्यांनी विवाह केला त्यांनी श्रद्धेचा अर्धा भाग पूर्ण केला आणि उरलेल्या अर्ध्यासाठी त्यांनी अल्लाहची भीती (ईशभय) बाळगली पाहिजे." आणखी एका हदीसमध्ये सांगितले आहे की, "स्त्रियांशी विवाह करा, त्या तुमच्या उत्पन्नवृद्धीचे माध्यम बनतील." माननीय जाबिर (रजि.) यांच्या हदीसच्या निवेदनानुसार, तीन व्यक्तींच्या मदतीची जबाबदारी अल्लाह आपल्या स्वत:वर घेतो. एक गुलामाला स्वतंत्र करणारी व्यक्ती, पडीक जमीन लागवडीयोग्य बनविणारी दुसरी व्यक्ती, तीसरी ती व्यक्ती जी अल्लाहच्या भरोशावर विवाह करते.

एका प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) तरूणासमोर बोलत असताना म्हणाले, "हे तरुणानो! तुम्हापैकी जो कोणी विवाह करू शकत असेल, त्याने जरूर विवाह करावा. कारण विवाह दृष्टीला अधिक अधोगामी ठेवू शकणारा आणि लैंगिक अवयवांचे अधिक संरक्षण करणारा असतो. जो विवाह करू शकत नसेल त्याने रोजे (उपवास) करावेत. कारण रोजे कामवासनेला

रोखण्याचे साधन आहेत.''

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

दुसऱ्या एका हदीसनुसार, तीन पुरुष पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पत्नींच्या घरापर्यंत आले. त्यांनी पैगंबरांच्या उपासनेच्या परिस्थितीसंबंधी चौकशी केली. त्यांना त्यासंबंधी सांगितले गेले, तेव्हा त्या तिघांना आपली उपासना कमी वाटली. तेव्हा ते म्हणाले, ''कोठे आम्ही आणि कोठे पैगंबर मुहम्मद (स.), त्यांच्या (पैगंबराच्या) पुढील, मागील सर्व चुकांना माफी मिळाली असतानासुद्धा ते इतकी उपासना करीत असतात.'' तदनंतर त्या तिघांपैकी एक म्हणाला, ''मी तर नेहमी पूर्ण रात्रभर नमाज पढत राहीन.'' दुसरा म्हणाला, ''मी नेहमी रोजे करीत जाईन. एकही रोजा चुकणार नाही.'' तिसरा म्हणाला, ''मी पत्नीपासून वेगळा राहीन. कधीही तिच्याशी शय्यासोबत करणार नाही.'' त्यावेळी पैगंबर त्यांच्याजवळ आले आणि म्हणाले, ''तुम्ही लोक असे बोलला होतात काय? तुम्ही हे चांगल्याप्रकारे समजून घ्या की, मी तुमच्यापेक्षा जास्त अल्लाहची भीती बाळगणारा आहे आणि त्याची आज्ञा भंग करण्यापासून मी स्वत:ला वाचवतो. असे असूनसुद्धा मी अनिवार्य नसलेले रोजे कधी करतो तर कधी करतही नाही, रात्री नफ्ल नमाज (अनिवार्य नसलेली) देखील पढतो आणि झोपसुद्धा घेतो आणि पत्नीशी शय्यासोबतही करतो. अशा परिस्थितीत जो कोणी माझ्या जीवनशैलीची उपेक्षा करील, त्याचा माझ्याशी काहीही संबंध नाही.''

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

पवित्र कुरआनच्या उपरोक्त काही आयाती आणि इतर अनेक आयातींद्वारे तसेच वर उल्लेखित काही हदीस आणि इतर अनेक हदीसींद्वारे इस्लाम व्यभिचारमुक्त समाज घडवू इच्छितो हे स्पष्ट होते. या समाजात आजन्म ब्रह्मचारी जीवन जगण्यास किंवा लैंगिक स्वैराचार यापैकी कोणत्याही एकास मुळीच वाव नाही. म्हणून इस्लाम जसा व्यभिचारास तीव्र विरोध करतो तसा लग्नविधीसुद्धा तितका सहजसुलभ करतो. इस्लाम आपल्या समाजात कोणाही तरूण व्यक्तीस अविवाहित पाहणेसुद्धा पसंद करीत नाही. म्हणूनच दास, दासी आणि विधवा, विधुर यांनासुद्धा लग्न करण्यास इस्लाम प्रोत्साहित करतो. जेणेकरून मुस्लिम समाज सत्प्रवृत्त आणि सदाचरणी बनावा.

प्रकरण २

# विवाह आणि महर

('महर' हा शब्द अरबी आहे. विवाहप्रसंगी वराने वधूस देण्याचे कबूल केलेल्या रकमेस 'महर' म्हणतात.)

स्त्री आणि पुरुषादरम्यान पत्नी आणि पतीचे नाते विवाहाशिवाय कोणत्याही प्रकारे प्रस्थापित होणे इस्लाम सहन करीत नाही. मान्य करीत नाही, उलट अशा नात्यास तीव्र विरोध करतो. ही बाब मागील प्रकरणाच्या अध्ययनाने स्पष्ट झाली आहे. एक पुरुष आणि एक स्त्री यांच्यादरम्यान विवाह ही एक अशी जाहीर प्रतिज्ञा आहे जी इस्लामने निश्चित केलेल्या मूल्यांनी ठरविल्यानुसार असून त्या अनुषंगाने स्त्री त्या एका पुरुषासाठी खास बनते आणि पतीला तीच्यावर पतित्वाचा हक्क प्राप्त होतो, तसेच पत्नीलासुद्धा त्या पुरुषावर पत्नित्वाचा हक्क प्राप्त होतो. इस्लामने पती आणि पत्नीचे हक्क निर्धारित केलेले आहेत.

## १. इस्लामी पुरुषप्रधान संस्कृतीचे नैतिक सामर्थ्य

समाजजीवनात इस्लामने पुरुषाला प्रधान म्हणून मान्य केले आहे. म्हणून इस्लामी कुटुंबात पुरुषप्रधान असतो, म्हणजे इस्लामी समाज पितृसत्ताक आहे. कुटुंबाचा प्रमुख पुरुष असतो. पत्नी आणि अपत्ये त्याच्या अधीन असतात. पुरुषाच्या तुलनेत स्त्री दुर्बल असते. म्हणून कित्येक बाबतीत ती पुरुषावर अवलंबून असते. एखादी व्यक्ती जितकी दुर्बल असते तितकीच ती सशक्त व्यक्तीकडून हक्क प्राप्त करून घेण्यास पात्र असते आणि सशक्त व्यक्ती दुर्बल व्यक्तीला तिच्या हक्काची पूर्तता करत नाही, तोपर्यंत त्या सशक्त व्यक्तीला दुर्बल समजले जाते. दुर्बल व्यक्तीला सशक्त व्यक्तीकडून हक्क मिळवून देणे हा इस्लामी समाजव्यवस्थेचा मूलभूत नैतिक सिद्धांत आहे. ह्या सिद्धान्तानुसार इस्लाम दुर्बलांना जास्त हक्क प्रदान करतो. म्हणून सशक्तांच्या तुलनेत दुर्बलांचा, श्रीमंताच्या तुलनेत गरिबांचा, निरोगीच्या तुलनेत रुग्णांचा, पुरुषांच्या तुलनेत स्त्रियांचा आणि स्त्रियांच्या तुलनेत बालकांचा इस्लाम अधिक पाठीराखा आणि कैवारी आहे. म्हणून विवाहप्रसंगीसुद्धा या सिद्धान्तास दृष्टीआड केले जात नाही.

## २. विवाहप्रसंगी 'महर'चे महत्त्व

इस्लामच्या या नैतिक मूलभूत सिद्धांतानुसार विवाहप्रतिज्ञेमध्ये, स्त्रीवर पत्नित्वाचा हक्क प्राप्त करण्याच्या मोबदल्यात काही रक्कम 'महर' (म्हणजे स्त्रीधन) म्हणून देण्याचे भावी पतीला धार्मिक कर्तव्य पार पाडावे लागते. विवाह ठरवीत असतानाच महरची रक्कम वधूपक्ष आणि वरपक्ष या दोन्ही पक्षांच्या सहमतीने नक्की केली जाते, या निश्चित केलेल्या रकमेस 'महर' म्हणतात. वधूपक्षाने भावी जावयाला हुंडा देण्याचे इस्लामी धर्मशास्त्रात मुळीच उल्लेखसुद्धा नाही. तथापि

भावी पतीने, विवाहप्रसंगीच वधूला 'महर' देण्याचे बंधन इस्लामी धर्मशास्त्राने घातले आहेत हे या पुस्तकाच्या वाचकांनी नीट लक्षात ठेवावे. पवित्र कुरआनमध्ये अनेक ठिकाणी विवाह करण्याच्या आदेशासोबतच 'महर'च्या रकमेचे निश्चितीकरण आणि त्या रकमेच्या परिपूर्तीसंबंधी आदेश देण्यात आले आहेत.

उदाहरणार्थ :-

"चरित्रवान व स्वतंत्र स्त्रिया मग त्या श्रद्धावंताच्या जमातीतील असोत अथवा त्या लोकसमुहातील ज्यांना तुमच्यापूर्वी ग्रंथ दिला गेला होता. परंतु अट अशी की तुम्ही त्यांचे महर अदा करुनच विवाह बंधनात त्यांचे रक्षक बनावे. तुम्ही त्यांचीशी स्वैर कामतृप्तीत लागावे किंवा लपून छपून अनैतिक संबध ठेवावेत."

*(दिव्य कुरआन, ५:५)*

'महर'ची परिपूर्ती करणे पतीचे कर्तव्य आहे याबाबतचे आदेश आहेत :-

"आणि त्या स्त्रियांदेखील तुमच्याकरीता निषिद्ध आहेत इतर कोणाच्या विवाहबंधनात असतील (मुहसनात) परंतु अशा स्त्रियांशी (विवाह करण्यामध्ये) त्या स्त्रिया अपवाद आहेत ज्या (युद्धामध्ये) तुमच्या हाती लागलेल्या असतील हा अल्लाहचा कायदा आहे ज्याचे पालन तुमच्यावर बंधनकारक आहे. याच्याखेरीज इतर ज्या स्त्रिया आहेत त्यांना आपल्या संपत्तीद्वारे प्राप्त करणे तुमच्यासाठी वैध करण्यात आले आहे परंतु अट अशी आहे की त्यांना विवाहबंधनात सुरक्षित करा असे नव्हे की तुम्ही स्वच्छंद कामतृप्ती करु लागाल. "

*(दिव्य कुरआन, ४:२४)*

स्त्रियांचा (भार्यांचा) हक्क समजून त्यांना खुशीने महर दिला जावा, असा आदेश पवित्र कुरआनातील अध्याय 'अन-निसा' मध्ये देण्यात आला आहे :-

"आणि स्त्रियांचे महर (स्त्रीधन) आनंदाने (कर्तव्य समजून) अदा करा."

*(दिव्य कुरआन, ४:४)*

'महर'ची रक्कम पत्नीचा हक्क आहे. त्याची परिपूर्ती करणे पतीचे कर्तव्य आहे. परंतु 'महर'ची परिपूर्ती केल्यानंतर पत्नीशी विभक्त व्हावे लागले, तरी तिला दिलेल्या संपत्तीमधून काहीही परत मागण्यात येऊ नये, मग या संपत्तीचे प्रमाण किती का असेना. याबाबतीत आदेश आहे :-

"आणि जर तुम्ही एका पत्नीच्या जागी दुसरी पत्नी आणण्याचा इरादाच केला असेल तर तुम्ही जरी तिला ढीगभर संपत्ती दिली असली तरी त्यातील किंचितही परत घेऊ नका."

*(दिव्य कुरआन, ४:२०)*

सही हदीसमध्येसुद्धा सक्त ताकीद देण्यात आली आहे. कारण पतीला पत्नीवर जे

पतित्वाचे हक्क प्राप्त होतात, त्याचा मोबदला 'महर' आहे. म्हणून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आदेश दिला आहे,

"ज्या प्रतिज्ञा आणि अटींना पूर्ण केलेच पाहिजे, त्यात सर्वांत अधिक पूर्ण करण्यायोग्य महरच्या परिपूर्तीची प्रतिज्ञा आहे, ज्याद्वारे तुमच्याकरिता स्त्रिया शास्त्रसमंत होतात."

(हदीस : बुखारी)

जर एखादा पुरुष लग्नप्रसंगी महरची रक्कम पत्नीला न देण्याची इच्छा करीत असेल, तर त्या पुरुषास हदीसमध्ये व्यभिचारी म्हटले गेले आहे. यावरून महरच्या रकमेची परिपूर्ती करणे किती आवश्यक बाब आहे याचा अंदाज येतो. हदीसमध्ये आदेश आहे :-

"ज्याने महर देण्याच्या बदल्यात एखाद्या स्त्रीशी विवाह केला आणि त्याचा हेतु महरची परिपूर्ती न करण्याचा असेल तर तो वास्तवात व्यभिचारी आहे."

## ३. 'महर' निश्चित करताना मध्यममार्ग स्वीकारणे

महरचे महत्त्व लक्षात घेऊन भरमसाठ महर ठरविण्यास इस्लामने प्रोत्साहन दिलेले नाही. पतीच्या आर्थिक परिस्थितीनुसार महर निश्चित केला जावा, हा त्यामागे उद्देश आहे. कारण महर पतीवर पत्नीचे कर्ज असते आणि ते फेडणे पतीचे कर्तव्य असते. म्हणून उपदेश करण्यात आला आहे,

"स्त्रियांचे पुरुषांशी विवाह करण्याचा प्रयत्न करा आणि महरच्या बाबतीत मर्यादेबाहेर जाऊ नका."

माननीय उमर (रजि.) यांनी स्पष्टीकरणार्थ सांगितले, "ऐका, स्त्रियांचे महर निश्चित करताना एक दुसऱ्याशी स्पर्धा करू नका. कारण जर ही बाब जगात प्रतिष्ठा वाढविणारी आणि अल्लाहसमोर सदाचार आणि संयम सिद्ध करणारी असती, तर त्याचे सर्वांत अधिक हक्कदार पैगंबर मुहम्मद (स.) होते. तथापि पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या कोणत्याही पत्नीशी विवाह करताना किंवा आपल्या मुलींच्या लग्नप्रसंगी बारा उकीयापेक्षा अधिक महर निश्चित केले असेल याची मला माहिती नाही." (हदीस: अबू दाऊद, तिर्मिजी, निसाई, इब्ने माजा, अहमद, दारमी)

(उकीया - चाळीस दिरमचे वजन - इंग्लिश एक औंस चांदीबरोबर)

## ४. मुस्लिमांच्या मातांचा महर

(पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पवित्र पत्नी यांना मुस्लिमांच्या माता मानल्या जातात.)

एका हदीसमध्ये निवेदन केले आहे :-

इसहाक बिन इब्राहीम, अब्दुल अजीज बिन मुहम्मद, यजीद बिन अब्दुल्लाह बिन उसामा बिन इलहाद (दुसरी सनद), मुहम्मद इब्न उमर मकी, अब्दुल अजीज, यजीद, मुहम्मद बिन

इब्राहीम, अबू सलमा बिन अब्दुर्रहमान हे सर्वजण निवेदन करतात की, त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पवित्र पत्नी माननीय आएशा सिद्दीका (रजि.) यांना विचारले की, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पवित्र पत्नींचा महर किती होता? त्यावर त्यांनी सांगितले की, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पवित्र स्त्रियांचा महर बारा उकीया आणि एक नश इतका असत होता. एक नश म्हणजे किती असे हे तुम्हाला माहीत आहे काय? मी सांगितले, 'नाही'. यावर त्यांनी सांगितले, 'नश म्हणजे अर्धा उकीया'. या हिशोबाने पाचशे दिरहम झाले आणि हाच पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या पवित्र स्त्रियांचा महर होता'.

(हदीस : मुस्लिम )

पाचशे दिरहम चांदीची गणना १०७५ माशा म्हणजे एक किलो ५३० ग्रॅम होते. सद्याचा चांदीचा भाव रु.३/- प्रत्येक ग्रॅम असेल तर १.५३० किलो चांदीची किंमत रुपये ४५९०/- होते. (आज शुक्रवार ता. ९ मार्च २००७ इ. स. चा चांदीचा प्रत्येक किलोचा भाव रु.१९६१५/ - आहे. या हिशोबाने १.५३० किलो चांदीची किंमत रुपये ३०,०१०.९५ पैसे होते.) परंतु मुस्लिमांच्या माता माननीय उम्मे हबीबा (रजि.) यांचा महर ४००० दिरहम किंवा ४००० दिनार होता. इतके दिरहम म्हणजे १२ हजार ६०० माशा, म्हणजे १२ किलो २४७ ग्रॅम चांदी होते. त्याचे रु.३/- ग्रॅम प्रमाणे रु.३६,७४१/- होतात. ता. ९ मार्च २००७ च्या भावाप्रमाणे रु.२४०२२५/ - माननीय फातिमा (रजि.) यांचा महर ४०० मिश्काल (चांदीचे) होते. ४०० मिश्कालचे १८०० माशा म्हणजे १५० तोळे होतात, ज्याची किंमत रु.४,५००/- होते.

## ५. महर फातमी

महर फातमी नावाने किंवा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या तथाकथित कायद्यानुसार समजून महरच्या काही प्रथा भारतात कशा सुरु झाल्या ते अल्लाहच जाणे! लोक या नावाने १२.५ रुपये, २५ रुपये किंवा १०१ रुपये महर निश्चित करून शरीयतचा हेतु पूर्ण करण्यात आला असे समजतात. तथापि मुस्लिमांच्या मातांचा आणि माननीय फातिमा (रजि.) यांचा महर किती होता याचा तपशील वर आला आहे. अधिक तपशीलाचे निरीक्षण करणे उचित ठरेल. माननीय फातिमा (रजि.) यांच्या विवाहासंबंधी अल्लामा शिबली नुअमानी या लेखकाने लिहिले आहे :-

"पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अली (रजि.) यांना विचारले की, महर देण्याकरिता तुमच्याजवळ काय आहे? 'काही नाही', असे अली (रजि.) यांनी उत्तर दिले. पैगंबर म्हणाले, 'आणि चिलखत?' (हे चिलखत बदरच्या लढाईत माननीय अली (रजि.) यांच्या हाती लागले होते.) माननीय अली (रजि.) यांनी उत्तर दिले 'ते तर माझ्याजवळ आहे'. पैगंबर म्हणाले, 'मग ते पुरेसे आहे'. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कन्यारत्न माननीय फातिमा (रजि.) यांचा विवाह माननीय अली (रजि.) यांच्याशी होण्यापूर्वीचे हे संभाषण आहे.

वाचकांना वाटत असेल चिलखत खूप मौल्यवान असेल. त्याची किंमत फक्त सव्वाशे रुपये (परंतु त्या वेळचे चांदीचे रुपये) होती. माननीय अली (रजि.) यांच्या मालमत्तेत एक सव्वाशे रुपयांची चिलखत, एक जनावराची कातडी, एक जुनाट फाटकी तुटकी यमनी चादर इतकेच होते. माननीय अली (रजि.) यांनी ही सर्व मालमत्ता माननीय फातिमा जुहरा (रजि.) यांना भेट म्हणून दिली. (सीरातुन्नबी, भाग १, पृष्ठ ३६७)

सीरातुन्नबी, भाग २ मध्ये सुलैमान नदवी लिहितात :-

माननीय अली (रजि.) यांनी विवाहाची इच्छा व्यक्त केल्यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विचारले, "महर देण्यासाठी तुमच्याजवळ काही आहे?" माननीय अली (रजि.) यांनी उत्तर दिले, "एक घोडा आणि एक चिलखत याशिवाय माझ्याजवळ काही नाही." पैगंबर म्हणाले, "घोडा तर लढाईसाठी आवश्यक असतो. चिलखत विकून टाका." माननीय उस्मान (रजि.) यांनी चिलखत ४८ दिरहमला खरेदी केले. माननीय अली (रजि.) यांनी ही रक्कम पैगंबरांना आणून दिली. पैगंबरांनी बिलाल (रजि.) यांना बाजारातून अत्तर आणण्यास सांगितले आणि तदनंतर विवाह संपन्न झाला.

(सीरातुन्नबी, भाग २, पृष्ठ ४६, संपादक शिबली नुअमानी,
विस्तारकार सय्यद सुलैमान नदवी)

मुफ्ती अजीजुर्रहमान देवबंदी यांनी इंग्लिश नाण्यात १३१ रुपये ३ आणे निश्चित केली आहे. (हे रुपयाचे नाणे चांदीचे होते) आणि मौलाना मुफ्ती मुहम्मद शफी यांनी ५०० दिरहम चांदीचे वजन १५४ तोळे १० मासे सांगितले आहे. (एक रुपया एक तोळे चांदीचा मानला तर रु.१३१/- ची चांदी १३१ x ११.७५ = १५३९ ग्रॅम चांदी होते. आणि ता. ९-३-२००७ च्या भावानुसार (रु.१९६१५/- किलो) १५३९ ग्रॅमचे रु. ३०,१८७ रुपये होतात.)

ही सर्व माहिती लक्षात घेतल्यास तर महर फातमीच्या नावावर निश्चित केला जाणारा रु.१२.५, रु. २५ किंवा रु.१०१/- इतका नगण्य महर इस्लामच्या इतिहासात कधीच आढळत नाही.

## ६. महरनिश्चितीस परस्परांची संमती आवश्यक

इस्लामी शरीयतने (कायदाशास्त्राने) महरची रक्कम निश्चित केलेली नाही. तथापि मार्गदर्शक तत्त्वे सांगितली आहेत, पुरुषाची आर्थिक कुव्वत आणि त्या त्या काळच्या आर्थिक परिस्थिती या दोन निकषांनुसार महरची रक्कम ठरविली जावी असे शरीयत सांगते. इस्लामी शरीयत कोणत्याही परिस्थितीत मध्यममार्ग पसंद करते. त्यानुसार महर नावापुरता एकदम कमीही असू नये किंवा एकदम कमाल लाखो करोडो रुपयेसुद्धा असू नये, असा उद्देश आहे. अबू हनीफा यांच्या मतानुसार, शरीयतप्रमाणे किमान दहा दिरहम चांदी इतका असावा. परंतु हे प्रमाण केवळ

पसंद करण्यात आले आहे. उलट एखाद्या पुरुषास ही रक्कमसुद्धा त्याच्या आर्थिक कुव्वतीपेक्षा अधिक असेल तर ती कमीसुद्धा ठरविली जाऊ शकते. कारण महर ही एक अशी रक्कम असते, ज्याची वसुली करणे स्त्रीचा हक्क असतो. एखाद्या पुरुषाने आपल्यावर लैंगिक हक्क प्रस्थापित करण्यास स्त्रीने स्वीकृती देण्याचा मोबदला म्हणून स्त्रीला हा हक्क प्राप्त होतो. समाजात निरनिराळ्या आर्थिक स्तराचे लोक असतात. म्हणून इस्लामी शरीयतने महर ठरविण्याबाबतीत स्वातंत्र्य दिले आहे. पुरुष आणि स्त्री यांनी (किंवा वर पक्ष आणि वधू पक्ष यांनी) आपापसात विचारविनिमय करून आपल्या आर्थिक कुव्वतीनुसार महरची रक्कम निश्चित करावी आणि आपल्या पावित्र्याच्या संरक्षणाची सोय करावी.

## ७. मिस्ल महर

विवाह संपन्न झाल्याबरोबर पतीवर पत्नीचा महरचा हक्क लागू होतो. जर एखाद्या विवाहप्रसंगी योगायोगाने महर निश्चित होऊ शकला नसेल, तरी महरची परिपूर्ती करणे पतीचे कर्तव्य ठरते. यावरून 'महर'च्या महत्त्वाचा अंदाज करता येतो. अशा परिस्थितीत जो महर दिला जातो, त्यास 'मिस्ल महर' म्हणतात. या प्रकारचा महर वधूपित्याच्या घराण्यातील स्त्रीचे आरोग्य, वय आणि सौंदर्यानुसार जो काही महर प्रचलित झाला असेल, तितका 'मिस्ल महर' निश्चित होतो. मिस्ल महरबाबत 'कन्जुल दकायक' या ग्रंथामध्ये उल्लेख आहे :-

"स्त्रीच्या पित्याच्या घराण्यातील एखाद्या स्त्रीचा, तीच्या वराचे वय, सौंदर्य, श्रीमंती, कौमार्य, बुद्धिमत्ता इ. शी अनुरूप महर निश्चित झाला असेल तितका 'मिस्ल महर' निश्चित होतो. जर वधूपित्याच्या घराण्यात अशी एखादी स्त्री नसेल, तर अपरिचित परंतु अशा परिस्थितीत असलेल्या स्त्रीचा जो काही महर निश्चित झालेला असेल, तोच महर या विवाहातील स्त्रीचा निश्चित करण्यात यावा."

(कन्जुल दकायक, पृष्ठ ७४)

## ८. 'महर'बाबत स्त्रीला पूर्ण स्वातंत्र्य आहे

इस्लामी शरीयतने महरच्या बाबतीत पूर्ण स्वातंत्र्य दिले आहे. याबाबत तिला निराधार करता येत नाही. म्हणून महरची कोणतीही मर्यादा निश्चित केलेली नाही. एकदा खलीफा माननीय उमर (रजि.) यांना, लोकांमध्ये खूप जास्त महर निश्चित करण्याची प्रवृत्ती दिसून आली. म्हणून त्यांना वाटले की, महरची कमाल मर्यादा आदेशाद्वारे ठरवून द्यावी, जेणेकरून त्या मर्यादेपेक्षा अधिक रकमेचे महर ठरविता येणे शक्य होऊ नये. उमर (रजि.) यांच्या विचारानुसार ही मर्यादा चाळीस उकीया (एक औंस चांदीच्या किंमती इतकी) इतकी असावी. त्यांनी एका प्रवचनात आपले हे मत जाहीर केले. हे ऐकून एका स्त्रीने त्यांची चूक सप्रमाण लक्षात आणून दिली. (येथे हे लक्षात घेणे जरूरीचे आहे की, खलीफा माननीय उमर (रजि.) हे एका प्रचंड

मोठ्या साम्राज्याचे सम्राट होते. त्यांना एका सामान्य, तेही एका स्त्रीने त्यांची चूक जाहीर सभेत लक्षात आणून दिली. ती त्यांनी मान्य करून चूक सुधारली. सामान्य माणसाच्या मताला आणि अभिव्यक्ती स्वातंत्र्यास खलीफांच्या राज्यात किती महत्त्व देण्यात येते होते हे दिसून येते) त्या स्त्रीने पवित्र कुरआनातील एका (खालील) आयतीची आठवण करून दिली.

"तुम्ही जरी तिला ढीगभर संपत्ती दिली असली तरी त्यातील किंचितही परत घेऊ नका." *(दिव्य कुरआन, ४:२०)*

या आयतीच्या कारणास्तव स्त्रीला मिळणाऱ्या 'महर'च्या रकमेवर मर्यादा लागू करण्याचा आपणास अधिकार नाही. हा चपखल युक्तिवाद ऐकून खलीफा माननीय उमर (रजि.) म्हणाले, एका स्त्रीने सत्य सांगितले आहे आणि पुरुषाने चूक केली. खरे तर महर रक्कम मर्यादित करण्यासाठी इस्लामी कायद्यात कोणतीही तरतूद नाही. परंतु यथार्थ हदीसनुसार प्रमाणित आहे की, महरच्या ज्यादा रकमेची अतिशयोक्ती करणे आणि पुरुषाच्या आर्थिक कुव्वतीपेक्षा अधिक, असहनीय अशी महरची ज्यादा रक्कम निश्चित करणे हे नापसंद कर्म आहे.

## ९. महरची रक्कम पूर्णपणे स्त्रीच्या मालकीची मालमत्ता असते

एखाद्या पुरुषाला पती म्हणून स्वीकारण्याच्या परिणामस्वरुप पत्नीला महरच्या रकमेवर हक्क प्राप्त होतो. हे आतापर्यंतच्या महरविषयक तपशीलावरून स्पष्ट होते. या परिस्थितीत स्त्रीला महर देणे त्या पुरुषाचे कर्तव्य ठरते. विवाह संपन्न होत असतानाच महरच्या रकमेची परिपूर्ती करणे हे सर्वोत्तम आणि श्रेयस्कर असते. पण त्या वेळी जर पतीला ही रक्कम पूर्णपणे देता येत नसेल, तर त्याचा एक हिस्सा तरी त्याने द्यावा. उरलेली रक्कम पतीवर कर्ज म्हणून राहील आणि पत्नी जेव्हा मागेल तेव्हा तिला ती द्यावी लागेल. परंतु अशा वेळीही देता येत नसेल तर पत्नी थांबू शकते. याप्रमाणे प्राप्त केलेल्या महरच्या रकमेत दुसरा कोणीही भागीदार असत नाही, त्या रकमेची मालकी पूर्णपणे पत्नीची असते. त्या रकमेवर इतर कोणाचाही हक्क असत नाही. जर पत्नीची इच्छा असेल तर पत्नी ती महरची रक्कम पूर्णपणे किंवा अंशत: माफ करू शकते. काहीजण जबरदस्तीने महरची रक्कम पत्नीकडून माफ करून घेतात. मात्र ही कृती शरीयतविरोधी असून ते पाप ठरते. जर पत्नीची इच्छा असेल तर ती पतीला महरची रक्कम खर्च करण्याची अनुमतीसुद्धा देऊ शकते. पत्नीला वाटले तर घरात खर्चही करू शकते किंवा तिच्या इच्छेनुसार ती कोणालाही देऊ शकते. याबाबतीत तिच्यावर कोणीही जबरदस्ती करू शकत नाही. जर महरच्या रकमेच्या परिपूर्तीपूर्वी पतीचे निधन झाले तर त्याला वारसाहक्काने मिळणाऱ्या रकमेतून पत्नीच्या महरची परिपूर्ती प्रथम करावी लागते. तदनंतर उरलेल्या वारसदारांना त्यांचा हिस्सा द्यावा लागतो. इतकेच नव्हे तर पत्नीशी संभोग होण्यापूर्वी तिला तलाक (घटस्फोट) देण्याचा प्रसंग आल्यास महरची अर्धी रक्कम पत्नीला द्यावी लागते. एखाद्या नफा मिळविणाऱ्या धंद्यात महरची रक्कम भाग भांडवल म्हणून गुंतविण्याचा पत्नीला हक्क आहे. या परिस्थितीतही महरची मूळ रक्कम आणि धंद्यातून मिळालेल्या नफ्यावर पूर्ण मालकी पत्नीची

असते आणि तिच्या परवानगीशिवाय दुसरी कोणतीही व्यक्ती मग ती कोणीही असो (अगदी पतीसुद्धा) या रकमेतून खर्च करण्याच्या हक्काचा दावा करू शकत नाही.

## १०. इस्लाममध्ये स्त्रीचे महत्त्व

इस्लाम जेव्हा एखाद्या स्त्रीला पुरुषाच्या अधिपत्याखाली सुपूर्द करतो आणि पुरुषाला तिचे नेतृत्व बहाल करतो, तेव्हा त्याला तिच्या आर्थिक दृढतेची कशी काळजी घ्यावी लागते आणि पुरुषाशी नात्याची गाठ बांधल्यावरसुद्धा त्याला तिच्या व्यक्तिगत वैशिष्ट्यांना कसे जपावे लागते, याचा अंदाज महरच्या तपशीलावरून करता येतो. महरच्या रकमेची संपूर्णपणे पत्नी मालक असतेच. शिवाय आई-वडील, इतर नातेवाईक आणि तिच्या मैत्रिणीकडून जे तिला विवाहप्रसंगी भेटीदाखल मिळते त्याचीसुद्धा तिच्या वैयक्तिक मालमत्तेत गणना होते. तसेच पती, सासुरवाडीतील लोकांकडून जे तिला भेटीच्या स्वरूपात मिळते ते सर्व तिच्या मालकीचे होते. पतीच्या मृत्यूनंतर त्याच्या वारस्यात तिचा हिस्सा असतो. याशिवाय पूर्ण आयुष्यातील तिच्या सर्व गरजांची पूर्तता करण्याची जबाबदारी पतीवर अनिवार्य करण्यात आली आहे. इस्लामने स्त्रियांना इतके हक्क दिलेले असतानासुद्धा जर एखादी व्यक्ती इस्लाममध्ये स्त्रियांवर अन्याय होतो असे म्हणत असेल, तर अशा व्यक्तीच्या विवेकावर शोक व्यक्त करणे शक्य आहे. तलाकच्या परिस्थितीतसुद्धा ही सर्व मालमत्ता तीचीच असते. इद्दतच्या (घटस्फोट अमलात येण्यापूर्वीचा इस्लामने ठरविलेला कालावधी) काळात स्त्रीच्या उपजीविकेची जबाबदारी पतीवर असते. इद्दत कालावधी पूर्ण झाल्यावर ती पुनर्विवाह करू शकते. इस्लाम स्त्रियांना किती महत्त्व देतो, त्यांचा उपरोक्त तपशिलावरून अंदाज करता येऊ शकतो.

प्रकरण ३

# 'जहेज' देण्याची प्रथा

विवाहप्रसंगीच्या रीतीरिवाजात 'जहेज' देण्याची महत्त्वाची प्रथा रूढ केली गेली आहे. वधूपिता वधूला 'जहेज' दिल्याशिवाय वरगृही पाठविण्यास कमीपणाचे समजतो. प्रत्येक वधूपिता आपले नातेवाईक, मित्रमंडळीसमोर आपल्या तथाकथित श्रीमंतीच्या वैभवाचे प्रदर्शन करण्यासाठी 'जहेज'च्या नावावर जास्तीतजास्त संसारोपयोगी साहित्य देण्याचा प्रयत्न करतो. वास्तविक ते त्याच्या आर्थिक कुव्वतीपेक्षा जास्तच असते.

## १. 'जहेज' शब्दाचा परिचय

'जहीज' या अरबी शब्दापासून, उर्दूत'जहेज' हा शब्द आला आहे. त्या अरबी शब्दाचा अर्थ केवळ सामान, साहित्य असा आहे. अरबीमध्ये जहहज, युजह्हिजु, जहीजन या क्रियापदांचा अर्थ सामान, साहित्य उपलब्ध करून देणे असा आहे. अरबी शब्द 'जहीज'चा अर्थ केवळ सामान आणि क्रियापदाचा केवळ 'सामान उपलब्ध करून देणे' असा असला तरी उर्दूमध्ये त्या शब्दापासून आलेल्या 'जहेज' या शब्दाचा अर्थ मात्र मुलीच्या विवाहप्रसंगी मुलीच्या पित्याने दिलेले संसारोपयोगी साहित्य असा अर्थ प्राप्त झाला आहे. उर्दूमध्ये 'जहेज' हा त्या अर्थाचा पारिभाषिक शब्द तयार झाला आहे. 'दहेज' हासुद्धा एक शब्द फारसी, उर्दू आणि हिंदीमध्ये प्रचलित आहे. हा 'जहेज'चा अपभ्रंश आहे. हिन्दी भाषेत 'दहेज' हा शब्द हुंडा (Dowry) या अर्थाने वापरला जातो. तथापि जहेज या शब्दाचा उर्दूत 'विवाहप्रसंगी मुलीला तिच्या पित्याने दिलेले संसारोपयी साहित्य' असाच अर्थ रूढ झाला आहे.

## २. 'जहेज' चे विविध प्रकार

विद्यमान काळात भारतीय मुस्लिमांमध्ये 'जहेज'चे दोन प्रकार प्रचलित आहेत.

**पहिला प्रकार** - विवाहानंतर मुलीला तिच्या नवऱ्याच्या घरी पाठविताना मुलीचा पिता आपल्या इच्छेनुसार मुलीला काही संसारोपयोगी साहित्य भेट म्हणून देतो. हा 'जहेज'चा पहिला प्रकार आहे.

**दुसरा प्रकार** - भारतातील मुस्लिम समाजात 'जहेज'चा दुसरा प्रकारही प्रचलित आहे. या दुसऱ्या प्रकारात लग्नापूर्वी वरपिता एका ठराविक रकमेची मागणी वधूपित्याकडे करतो आणि वधूपित्याने ती रक्कम मान्य केल्यास विवाह शर्तीनुसार ती रक्कम देणे वधूपित्यावर बंधनकारक असते. बहुदा ही रक्कम वरात निघण्यापूर्वी म्हणजे वर (नवरा) घोड्यावर बसून बँडबाजासह वधूगृही लग्नासाठी येण्यास निघण्यापूर्वी वसूल केली जाते. या सौदेबाजीत रोख रकमेबरोबर टि व्ही, फ्रीज, मोटारगाडी किंवा मोटार सायकल यासारख्या विविध वस्तू, कपडे आणि वरातीबरोबर येणाऱ्या

पाहुण्यांचा पाहुणचाराच्या खर्चाच्या रकमेची मागणी वरपिता करीत असतो. या प्रथेचा उगम 'जहेज'च्या प्रथेतून झालेला आहे. या प्रथेससुद्धा 'जहेज' म्हटले जाते. या प्रथेस 'जोडे-घोडे'ची प्रथासुद्धा म्हटले जाते. हिंदी भाषेत या प्रकाराला 'दहेज', मराठीत 'हुंडा' आणि इंग्रजीत (Dowry) 'डावरी' म्हणतात. या प्रकारास प्रतिबंध करण्यासाठी भारतात केंद्र शासनाने १९८५ साली Dowry Prohibition Act केला आहे आणि महाराष्ट्र शासनाने १९८८ साली 'हुंडा प्रतिबंधक कायदा' केला आहे. या परिस्थितीत इस्लाममध्ये 'जहेज'च्या पहिल्या प्रकारास तरी मान्यता किंवा परंपरा आहे काय आणि 'जहेज'च्या दुसऱ्या प्रकाराविषयी इस्लाममध्ये काय स्थान आहे हे पाहणे उद्‌बोधक ठरेल.

## ३. 'जहेज'च्या पहिल्या प्रकारासही इस्लाममध्ये स्थान नाही.

'जहेज'चा पहिला प्रकार म्हणजे विवाहप्रसंगी वधूपित्याने मुलीला संसारोपयोगी साहित्य भेट म्हणून देण्याची प्रथा भारतातील मुस्लिम समाजात फार जुनी असली तरी 'वसीर' नामक इस्लामी ऐतिहासिक ग्रंथाच्या अभ्यासात, या प्रथेचे अस्तित्व संपूर्ण अरबस्तानात कुठेही दिसून येत नाही. स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जितके विवाह केले, त्यापैकी कोणत्याही विवाहात 'जहेज'च्या नावे एकही वस्तू वधूपक्षाकडून दिली गेल्याचे दिसून येत नाही. माननीय अबू बकर (रजि.) यांनी आपली कन्या माननीय आयेशा (रजि.) यांच्या लग्नप्रसंगीसुद्धा पैगंबर मुहम्मद (स.) यांना 'जहेज' म्हणून कोणतीही वस्तू दिली नव्हती. इतकेच नव्हे तर स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या चार कन्यारत्नांचे माननीय जैनब (रजि.), माननीय रुकैया (रजि.), माननीय उम्मे कुलसुम (रजि.) आणि माननीय फातिमा (रजि.) यांचे विवाह केले. माननीय जैनब (रजि.) यांचा विवाह अबूल आस बिन रबिअ लकैत यांच्याशी, आदरणीय मुहम्मद (स.) यांना पैगंबरत्व प्राप्त होण्यापूर्वीच्या काळात झाला होता. त्याचप्रमाणे माननीय रुकैया (रजि.) आणि माननीय उम्मे कुलसूम (रजि.) या दोन्ही बहिणींचे विवाह अबू लहब यांचे दोन पुत्र उतबा आणि उतैबा यांच्याशी झाले होते. हे दोन विवाहसुद्धा पैगंबर मुहम्मद (स.) यांना पैगंबरत्व प्राप्त होण्यापूर्वी झाले होते. तदनंतर प्रथम माननीय रुकैया (रजि.) आणि त्यांच्या मृत्यूनंतर माननीय उम्मे कुलसूम (रजि.) यांचा विवाह माननीय उस्मान गनी (रजि.) यांच्याशी झाला होता. तथापि वसीर नामक इस्लामी ऐतिहासिक ग्रंथाच्या अध्ययनावरून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या चारही कन्यारत्नांच्या विवाहात 'जहेज'च्या नावावर कोणतीही वस्तू आपल्या कन्यांना दिल्याचे आढळून येत नाही.

इस्लामपूर्व काळात, पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या कन्यारत्नांच्या विवाहांमध्ये आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांचे इस्लामपूर्व कालात झालेला एक विवाह आणि इस्लाम अवतीर्ण झाल्यानंतरच्या काळात पैगंबर मुहम्मद (स.) यांचे झालेले अनेक विवाह यामध्ये 'जहेज' या प्रथेचा मागमूसही आढळत नाही. यावरून इस्लामपूर्व काळात किंवा इस्लामपश्चात काळात

'जहेज'ची प्रथा मुळीच नव्हती, हे दिसून येते. कदाचित याच कारणास्तव, 'जहेज'चे समर्थन करणारे मुस्लिम या उपरोल्लेखित विवाहांपैकी एखाद्या विवाहाचेही उदाहरण देत नाहीत.

परंतु इस्लामी इतिहास ग्रंथ 'वसीर'मधील उल्लेखावरून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपले कन्यारत्न फातिमा जुहरा (रजि.) यांचा, माननीय अली (रजि.) यांच्याशी विवाह केल्यानंतर निरोपाच्या वेळी काही सामान दिले होते. 'जहेज'चे समर्थन करणारे मुस्लिम या विवाहाचे उदाहरण देतात आणि त्या विवाहात दिलेल्या 'काही सामानास' जहेज म्हणतात. परंतु हा 'जहेज' होता किंवा नाही याचा निर्णय घेण्यापूर्वी त्याबाबतचा तपशील पाहणे योग्य ठरेल.

माननीय फातिमा जुहरा (रजि.) यांच्या विवाहात जे काही सामान दिले होते त्याचा तपशील अल्लामा शिबली नुमानी यांनी 'पैगंबरांचे चरित्र' या ग्रंथाच्या भाग एकमध्ये दिला आहे, तो असा :-

"इहलोक आणि परलोकच्या सम्राटाने (पैगंबर मुहम्मद (स.)) यांनी जगाच्या सरदार (माननीय फातिमा (रजि.)) यांना जो 'जहेज' दिला त्यामध्ये सुगंधी झाडाच्या लाकडाचा एक पलंग, चामड्याची एक गादी ज्यात कापूस नसून खजूराची पाने होती. एक पाणी भरण्यासाठी मातीचे छोटे भांडे, एक पखाल, दोन दळणाच्या चक्क्या आणि मातीच्या दोन घागरी यांचा समावेश होता." - सीरतुन नबी, भाग एक, पृष्ठ ३६७

याच बाबतीत अल्लामा सय्यद सुलैमान, आपला ग्रंथ 'सीरतुन नबी' या ग्रंथाच्या भाग दोनमध्ये लिहितात :-

"जहेजमध्ये एक पलंग, एक बिछाना दिला होता." त्याच ग्रंथात सुरवातीस लिहिले आहे की, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एक चादर, दोन चक्क्या, एक पखालसुद्धा दिले होते आणि आश्चर्याची बाब ही आहे की, याच दोन वस्तू आयुष्यभर त्यांच्यासोबत (माननीय फातिमा (रजि.) यांच्यासोबत) होत्या. (सीरतुन नबी, भाग दोन, पृष्ठ ४२८९)

या बाबतीत दुसरे एक लेखक इस्माईल पानीपती आपल्या ग्रंथात लिहितात -

"हिजरतनंतर सुमारे दीड वर्षांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपली सर्वांत छोटी मुलगी फातिमा (रजि.) हिचा विवाह माननीय अली (रजि.) यांच्याशी केला त्यावेळी माननीय अली (रजि.) याच्याजवळ काहीही नव्हते, खायलासुद्धा काही नव्हते, राहायला घर नव्हते. एक चिलखत होते तेही विकून लग्न आणि वलीमा (लग्नानंतर वर पक्षाकडून दिले जाणारे भोजन) चे साहित्य खरेदी करण्यात आले होते. हे चिलखत त्यांनी सव्वाशे रुपयात (रुपये १२५/-) विकले होते. हारिस बिन नुअमानी नामक एका मदतगाराने, त्याच्याकडे असलेल्या अनेक घरांपैकी एक घर माननीय अली (रजि.) यांना दिले होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्या घरात आपल्या मुलीची पाठवणी केली. याप्रमाणे माननीय अली (रजि.) आणि माननीय फातिमा (रजि.) यांनी

दांपत्य जीवनाची सुरवात केली."

मौलाना सय्यद अबुल आला मौदूदी याबाबतीत आपल्या ग्रंथात लिहितात -

"याप्रमाणे माननीय अली (रजि.) बालपणीच पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे पालनपोषणासाठी आले होते. पैगंबर आणि त्यांच्या पहिल्या पत्नी माननीय खदीजा (रजि.) यांनी माननीय अली (रजि.) यांचे आपल्या मुलाप्रमाणे पालनपोषण केले. माननीय अली (रजि.) यांचे त्या वेळी वय जवळजवळ ४-५ वर्षापेक्षा अधिक नव्हते."

('सीरत सरवरे आलम', भाग दोन, पृष्ठ १२०)

या बाबतीत अल्लामा शिबली नुअमानी आणि मौलाना सय्यद सुलेमान नदवी आपल्या ग्रंथात लिहितात :-

"माननीय अली (रजि.) आतापर्यंत (विवाहाच्या वेळेपर्यंत) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या घरी राहत होते. लग्नानंतर वेगळे घर घेण्याची गरज होती. माननीय हारिस (रजि.) बिन नुअमानी अन्सारी यांची अनेक घरे होती. त्यांनी त्यातील एक घर खाली केले. माननीय फातिमा (रजि.) विवाहानंतर त्या घरात राहायला गेल्या." (सीरतुन नबी, भाग दोन, पृष्ठ ३६७)

या बाबतीत मौलाना सय्यद अहमद अली, 'माहनामा जिन्दगी' (मासिक) मध्ये लिहितात -

"पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय फातिमा (रजि.) यांना ज्या वस्तू दिल्या होत्या त्या जरी गरजेपायी दिल्या होत्या, तथापि ती 'जहेज'ची कोणतीही प्रथा नव्हती. परंतु मुस्लिम समाजाच्या काही विद्धानांनी याला 'जहेज' म्हटले आहे आणि विवाहप्रसंगी मुलीला काही सामानसुमान देण्याचा युक्तिवाद केला आहे." (माहनामा जिन्दगी, मुहरमुल हराम, १४०३ हिजरी)

त्यात ते नंतर म्हणतात -

"जर हे सामानसुमान अटी घालून आणि जबरदस्ती करून घेतलेले नसेल आणि मर्यादेपेक्षा अधिक नसेल तर अनुचित नाही. समस्या कोणतीही असो मध्यममार्ग आणि संतुलनाला तिलांजली देता कामा नये." (माहनामा जिन्दगी, मुहरमुल हराम, १४०३ हिजरी ९)

यावरुन माननीय फातिमा (रजि.) यांच्या विवाहप्रसंगी ज्या परिस्थितीत काही अत्यंत गरजेच्या वस्तु दिल्या गेल्या त्याचा विद्यमान 'जहेज' प्रथेचा आधार समजणे अतिशयोक्ती आहे. लग्नाप्रसंगी वराची संपत्ती आणि धनदौलत पाहण्याऐवजी त्याचा सदाचार आणि ईशभीरूता याला महत्त्व देणे आवश्यक आहे, हा या उदाहरणावरून अत्यंत महत्त्वाचा बोध होतो. या (माननीय अली (रजि.)) उदाहरणात तर वर मुलाचे अठरा विश्व दारिद्रय आहे. वर मुलाची सांपत्तिक स्थिती न पाहता, त्याचा सदाचार आणि त्याची ईशभीरूता पाहावी हा अत्यंत महत्त्वाचा बोध न घेता, या उदाहरणातील दिलेल्या काही साहित्याचा विद्यमान

'जहेज' प्रथेशी संबंध जोडून वधूपित्याकडून जास्तीतजास्त 'जहेज' घेण्याचा प्रयत्न करणे हे अत्यंत चुकीचे आहे, हे मुस्लिम समाजाने समजून घ्यावे.

तथापि मुस्लिम समाजाच्या दुर्दैवास काय करावे? तो समाज जीवनातील इतर व्यवहारांप्रमाणे प्रथा नसलेल्या व्यवहारातसुद्धा मध्यममार्ग आणि संतुलन कायम राखण्यास निष्प्रभ ठरत आहे. वरपक्षच नव्हे वधूपक्षही अनिष्ठ प्रथा पाळून नातेवाईक, मित्रमंडळीसमोर, श्रीमंती, वैभव आणि इभ्रत यांचे प्रदर्शन करण्यासाठी जास्तीतजास्त 'जहेज' देण्यात धन्यता मानीत आहेत. समतोल आणि मध्यममार्ग ओलांडून मर्यादा भंग करतातच, शिवाय कर्जाच्या बोज्याखाली दबून जाऊन वर्षानुवर्षे कर्ज फेडण्याची शिक्षा भोगत राहतात. अत्यंत साध्या आणि कमी खर्चात विवाह करण्याच्या इस्लामच्या पद्धतीला मुस्लिम समाज विसरत आहे आणि कर्जबाजारी होत आहे, हे मुस्लिम समाजाचे दुर्दैव नाही काय?

आतापर्यंतच्या सविस्तर विवेचनावरून खालील बाबी स्पष्ट होतात -

इस्लामपूर्व काळात, मुलीच्या विवाहप्रसंगी तिला संसारोपयोगी साहित्य देण्याची प्रथा म्हणजे 'जहेज'च्या पहिल्या प्रकारास संपूर्ण अरबस्थानात मान्यता नव्हती.

इस्लामपूर्व काळात म्हणजे पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्वत: एक विवाह केला होता, त्या वेळीही त्यांच्या पत्नीला 'जहेज' देण्यात आला नव्हता.

प्रेषित्व प्राप्त झाल्यानंतरच्या काळात स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अनेक विवाह केले, त्यापैकी कोणत्याही विवाहाप्रसंगी 'जहेज' देण्यात आला नव्हता.

इस्लामपूर्व काळात, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या तीन मुलींचे विवाह केले, त्यापैकी कोणत्याही विवाहप्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी एकाही मुलीला 'जहेज' दिला नव्हता.

इस्लामच्या उदयानंतर म्हणजे पैगंबर मुहम्मद (स.) यांना प्रेषित्व प्राप्त झाल्यानंतर त्यांनी आपली एक मुलगी माननीय फातिमा (रजि.) यांचा विवाह केला. या विवाहात त्यांनी काही मोजक्या निकडीच्या संसारोपयोगी वस्तू तिला दिल्या होत्या. 'जहेज'चा शब्दश: अर्थ 'सामानसुमान' असल्यामुळे त्या दिलेल्या वस्तूंना 'जहेज' म्हटले गेले. तथापि या वस्तूंचा 'जहेज'च्या प्रथेशी मुळीच संबंध नव्हता. कारण 'जहेज'ची प्रथाच अस्तित्वात नव्हती.

माननीय फातिमा (रजि.) यांच्या विवाहप्रसंगी दिलेला 'जहेज' कोणत्या परिस्थितीत दिला गेला होता हे पाहणे याबाबतीत निर्णय घेण्यापूर्वी योग्य ठरेल. पैगंबरांनी माननीय फातिमा (रजि.) यांचा विवाह माननीय अली (रजि.) यांच्याशी केला होता. माननीय अली (रजि.) हे पैगंबरांचे चुलते अबू तालिब यांचे पुत्र होते. म्हणजे माननीय अली (रजि.) हे पैगंबर मुहम्मद (स.) यांचे चुलत भाऊ होते. माननीय अली (रजि.) हे अगदी लहान म्हणजे पाच वर्षांचे असल्यापासून पैगंबरांनी त्यांचा सांभाळ आपल्या मुलाप्रमाणे केला. माननीय अली (रजि.) हे पैगंबरांच्या घरी

राहत होते. माननीय अलीनी, माननीय फातिमा (रजि.) यांच्याशी जेव्हा विवाह केला त्या वेळी त्यांच्याजवळ एका चिलखतीशिवाय काहीही नव्हते. घर तर नव्हतेच, खायलाही काही नव्हते. माननीय अली (रजि.) यांनी कोणत्याही वस्तूची मागणी केली नव्हती. आपल्या पुत्राच्या विवाहनंतर राहणे, खाणे-पिणे योग्य तऱ्हेने व्हावे, या दृष्टीने पैगंबर मुहम्मद (स.) यांनी काही संसारोपयोगी साहित्य आपणहून दिले होते. त्यात आजच्याप्रमाणे 'जहेज' प्रथेचा काडीमात्र संबंध नव्हता. म्हणून पैगंबरांनी दिलेल्या साहित्याला आजच्या 'जहेज' प्रथेशी संबंध जोडणे योग्य होणार नाही. आपल्या मुलीला आणि पुत्रासमान असलेल्या जावयाला त्यांच्या संसारात उपयोगी पडतील असे अत्यंत निकडींचे साहित्य दिल्याचे हे एकच उदाहरण आहे, तर अनेक उदाहरणे जहेज न दिल्याची आहे, म्हणून एकमेव उदाहरणास, प्रथा रूढी, परंपरा किंवा रीतीरिवाज म्हणता येणार नाही. 'महर'ला जसा पवित्र कुरआन आणि हदीसचा आधार आहे, तसा 'जहेज'च्या कोणत्याही प्रकारास पवित्र कुरआन आणि हदीसचा आधार नाही. थोडक्यात 'जहेज'च्या कोणत्याही प्रकारास पवित्र कुरआन, हदीस आणि रूढीचा आधार नाही.

म्हणून विवाहप्रसंगी मुलीला संसारोपयोगी साहित्य देण्याच्या प्रथेला म्हणजे 'जहेज'च्या पहिल्या प्रकारास इस्लाममध्ये स्थान नाही.

'जहेज'च्या पहिल्या प्रकारातून 'जहेज'च्या दुसऱ्या प्रकाराचा म्हणजे 'हुंडा' देण्याच्या प्रकाराचा उगम होतो. तथापि 'जहेज'च्या पहिल्या प्रकारास इस्लाममध्ये स्थान नसल्यामुळे दुसऱ्या प्रकारास ही इस्लाममध्ये मुळीच स्थान नाही, हे वेगळे सांगण्याची आवश्यकता नाही.

## ४. 'जहेज'चा दुसरा प्रकार

'जहेज' च्या दुसऱ्या, प्रकारात वरपिता वधूपित्याकडे काही ठराविक रकमेची मागणी करतो. या सौदेबाजीत ठराविक रकमेबरोबर सोने, वराचे कपडे अनेक प्रकारच्या वस्तू, वरातीबरोबर येणाऱ्या पाहुण्यांच्या पाहुणचाराचा खर्च इ. च्या रकमेचाही समावेश असतो. लग्नविधीपूर्वीच ही सर्व रक्कम वधूपित्याकडून वसूल केली जाते. याला 'जहेज'चा दुसरा प्रकार किंवा 'हुंडा' (Dowry) म्हटले जाते. भारतातील सर्व राज्यांत कमी-अधिक प्रमाणात 'हुंड्याची प्रथा' प्रचलित आहे. दक्षिण भारतातील कर्नाटक, केरळ, तामिळनाडू, आंध्र प्रदेश इ. बहुतेक सर्व प्रांतांत ही प्रथा प्रचलित आहे. उत्तर भारतातील बिहार, बंगाल इ. काही प्रांतांतील समाजातसुद्धा ही प्रथा रूढ आहे. महाराष्ट्रातसुद्धा ही प्रथा प्रचलित आहे. या प्रथेमुळे वधूपित्याची पिळवणूक केली जाते. लग्नाआधी भरपूर हुंडा घेऊनसुद्धा लग्नानंतर अधिक रक्कम मिळविण्यासाठी विवाहित स्त्रीचा क्रूर छळ केला जातो. त्यासाठी विवाहित स्त्रीला जाळून मारण्यापर्यंत मजल जाते. अशा तऱ्हेची पिळवणूक आणि हुंडाबळी रोखण्यासाठी भारत सरकारने १९८५ साली 'डावरी प्रोहीबिशन ॲक्ट' हा कायदा संमत केला आहे. तसेच महाराष्ट्र शासनाने १९८८ साली 'हुंडा

प्रतिबंधक कायदा' केला आहे. तथापि या दुसऱ्या प्रकारच्या 'जहेज' च्या प्रथेचा म्हणजे हुंड्याच्या प्रथेच्या अस्तित्वाचा इस्लामच्या इतिहासात अजिबात उल्लेख आढळत नाही. तसेच भारताशिवाय जगातील कोणत्याही भागातील इस्लामी समाजात हुंड्याची प्रथा आजही अस्तित्वात नाही.

## ५. हुंड्याच्या प्रथेच्या उद्‌गमाचा शोध

इस्लामच्या सामाजिक शिक्षणाशी या हुंड्याच्या प्रथेचा काहीही संबंध नाही आणि मुस्लिम समाजानेही या प्रथेची निर्मिती केली नाही. जगामध्ये फक्त भारतात वसलेल्या मुस्लिमांमध्ये ही प्रथा आढळून येते. या परिस्थितीत शेवटी या प्रथेने मुस्लिम समाजात प्रवेश कोठून झाला आहे याचा शोध घेण्याची आवश्यकता आहे. भारतीय समाजात ही प्रथा प्राचीन काळापासून अस्तित्वात आहे. याचा पुरावा भारतीय समाजाच्या अभ्यासातून मिळतो. हिंदू समाजातील वैश्य (व्यापार-उदीम करणारे) नावाच्या समाजघटकास प्रथम या प्रथेने सर्वांत अधिक ग्रासले असल्याचे दिसून येते. येथूनच या प्रथेने आता हिंदू समाजाच्या इतर घटकांत आणि या देशातील मुस्लिम समाजात प्रवेश केला आहे. जेथे मुस्लिम शासक म्हणून नव्हे तर फक्त व्यापारी म्हणून राहत होते, त्यांच्यात या प्रथेने प्रथम प्रवेश केला. शिवाय भारतीय समाजातील ज्यांनी मुस्लिम धर्म स्वीकारून इस्लाममध्ये प्रवेश केला होता. त्यांनी ही अनिष्ठ प्रथा इस्लाममध्ये आणली. हळूहळू मुस्लिम समाजातील मोठा हिस्सा या प्रथेने ग्रस्त झाला आहे.

प्रकरण ४

# हुंड्याच्या प्रथेचे ऐतिहासिक अध्ययन आणि हिंदू समाज

## १. हुंड्याच्या प्रथेचे ऐतिहासिक अध्ययन

'जहेज' च्या या दुसऱ्या प्रकाराचा म्हणजे हुंड्याच्या प्रथेचा संबंध पूर्णपणे हिंदू समाजाशी आहे. स्त्रियांसंबंधीच्या हिंदू धर्माच्या तत्त्वज्ञानात त्याचे मूळ आहे. त्या तत्त्वज्ञानानुसार पुरुषापेक्षा स्त्रियांना क्षुद्र समजले जाते.

## २. हिंदू धर्म आणि स्त्री

वेदांमध्ये स्त्रियांसंबंधी जे विचार आढळतात. त्याचे वर्णन पूरी मठाचे जगतगुरू शंकराचार्य श्री निरंजन देव तीर्थ लिहितात :

"When the bodies are not equal, how can rights be equal ? When the minds are not equal, how can rights be equal ?.....

Our scripture say that as compared to a man, a woman eats twice as much, is four times clever, six times braver and eight times more lustful."

- Illustrated Weekly of India, dt. 1-5-1988

अनुवाद - "जेव्हा शरीरे समान नाहीत, तर हक्क कसे समान असू शकतात? जेव्हा मनोव्यापार समान नाहीत, तेव्हा हक्क कसे समान असू शकतात?

आमचे धर्मग्रंथ सांगतात की, पुरुषाच्या तुलनेत स्त्री दुप्पट खाते, चौपट धूर्त असते, सहापट धीट असते आणि तिची कामवासना आठपट असते."

(इलस्ट्रेटेड विकली ऑफ इंडिया, दि. १-५-१९८८)

या मतावर पुन्हा एकदा चिंतन केले जावे आणि त्यात दडलेल्या उद्देशापर्यंत पोहोचण्याचा प्रयत्न केला जावा. स्त्री दुप्पट खाते म्हणजे जणू काही तिचे पालनपोषण अधिक महागडे असते. ती चौपट धूर्त असते म्हणजे ती कोणत्याही तऱ्हेने आणि कोणतीही सबब पुढे करून चतुराईने आपली गरज पूर्ण करून घेते. ती आपल्या धीटपणाचा आणि धूर्तपणाचा उपयोग करून कसेही करून आपली कामवासना पूर्ण करून घेते, त्यामुळे मातापित्यांनी किंवा पतीने विश्वास ठेवण्यास कोणत्याही तऱ्हेने ती लायक नसते.

या प्रकारच्या वेदातील शिक्षणाच्या परिणामांमुळे हिंदू समाजाचे याबाबतीतील विचार इतक्या खालच्या स्तरावर पोहचले की, ते विचार पाहूनसुद्धा घृणा निर्माण होते. उदाहरणार्थ, स्त्री इतकी व्यभिचारी असते की, ती आपल्या पित्याला आणि भावालासुद्धा सोडत नाही, असे मनुस्मृतीत म्हटले आहे. तिला फक्त पुरुष दिसतो, तो समोर पाहून ती पाघळू लागते. ती त्या पुरुषाचा चेहरा पाहण्याची पर्वा करीत नाही. अशा तऱ्हेच्या विचारांचे बारकाईने परीक्षण व्हावे :

"स्त्रिया चेहरा पाहत नाहीत, त्या त्याच्या वयाचाही विचार करीत नाहीत. सुंदर असो की कुरूप असो, त्या त्याच्याकडून संभोग करून घेतात." (मनुस्मृती, ९-१४)

याबरोबर श्री रामचंद्र भगवान यांनी गरूडाशी केलेले संभाषण ऐकावे. या संभाषणाचे वर्णन रामायणात असे केले आहे -

"हे गरूड! स्त्री सुंदर पुरुषाला पाहताच, मग तो भाऊ असो, बाप असो किंवा पुत्र का असेना, ती बेचैन होते आणि आपल्या मनाला ती रोखू शकत नाही. ज्याप्रमाणे सूर्याला पाहिल्यास सूर्यकान्त मणि पाघळून जातो. त्याप्रमाणे सुंदर पुरुषाला पाहून स्त्री पाघळून जाते."

(रामायण अरण्य कांड, ४-२८)

स्त्रीबाबत असा घृणास्पद विचार हिंदू धर्माने सांगितला आहे. जेव्हा स्त्री पुरुषापेक्षा आठपट लंपट, व्यभिचारी असते तेव्हा तिच्यावर नियंत्रण ठेवण्यासाठी काही उपाय योजण्याचीसुद्धा आवश्यकता निर्माण होते हे उघड आहे. म्हणून त्याबाबतीत मनुस्मृतीच्या श्लोकांचे परीक्षण केले जावे.

(१) स्त्रीने बालपणी पित्याच्या, तरूणपणी पतीच्या, पतीच्या मृत्यूनंतर पुत्राच्या अधीन होऊन राहावे. (मनु स्मृती, ५-१४८)

(२) "पुरुषांनी आपल्या पत्नींना कधी स्वातंत्र्य देऊ नये." (मनुस्मृती, ९-२)

(३) "जर पती चारित्र्यहीन असेल किंवा तो दुसऱ्या स्त्रीशी संबंध ठेवून असेल किंवा तो विद्याहीन असेल तरीसुद्धा त्याला देव समजून त्याची नेहमी सेवा केली पाहिजे."

(मनुस्मृती, ५-१५४)

(४) "स्त्री बालपणात असो, तारूण्यात असो किंवा वृद्धावस्थेत असो तिने घरचे कोणतेही कार्य स्वातंत्र्यपूर्वक करता कामा नये." (मनुस्मृती, अध्याय ५, श्लोक १४७)

(५) "तीस वर्षे वयाच्या पुरुषाने बारा वर्षे वयाच्या मुलीशी विवाह करावा, चोवीस वर्षे वयाच्या पुरुषाने आठ वर्षे वयाच्या मुलीशी विवाह करावा याविरुद्ध वागणारा पुरुष संकटात पडतो." (मनुस्मृती, अध्याय ४ श्लोक ९४)

(६) "कामदेवाची सर्वांत मोठी शक्ती स्त्री आहे. तिच्याशी ज्याने मुक्ती मिळविली तोच शूर आहे." (अरण्यकांड, ६-६७)

(७) "स्त्रीच्या मनाचा थांग प्रत्यक्ष परमेश्वराला लागू शकत नाही. स्त्रीचे मन कपट, पाप आणि दोष यांनी पूर्णपणे भरलेले असते." (अयोध्या कांड, २-२६२)

(८) भगवान श्रीरामचंद्र म्हणतात, "स्त्रीवर अगदी मनापासून प्रेम करा, तरी स्त्रीशास्त्र आणि राजा कोणाच्याही नियंत्रणात राहत नाही. (अरण्यखंड, ५-१, ६५)

ह्या श्लोकांचे पुन्हा पुन्हा वाचन करून त्यापासून कोणते परिणाम होऊ शकतील

शोधण्याचा प्रयत्न करावा. वेदांच्या उपदेशानुसार, मुलगी मुलापेक्षा दुप्पट खाते आणि मुलापेक्षा आठपट व्यभिचारी भावना तिच्यात उत्पन्न होतात आणि कामवासनेचे समाधान करून घेण्यास ती बेचैन असते आणि जेव्हा कोणी पुरुष उपलब्ध होत नाही तेव्हा ती बाप, भाऊ किंवा पुत्रालासुद्धा सोडत नाही. म्हणून तिला उष्टे खाऊ द्यावे, तिला अर्धपोटी ठेवावे. हाच त्यावर उपाय होऊ शकत नाही काय? जेणेकरून तिची लैंगिक भूक किमान निम्म्यावर येऊ शकेल. अशा स्थितीत भारतातील शासन, सुधारणावादी संस्था, महिला मंडळ यांनी ओरड केली की, देशात मुलींना योग्य व पुरेसे अन्न दिले जात नाही, त्यांच्या आरोग्याची काळजी योग्य तऱ्हेने घेतली जात नाही. तर या आरडाओरडीवर कोण लक्ष देईल? लोक तर वेदांच्या उपदेशांचे पालन करीत आहेत.

दुसरे असे, या उपदेशांनी माता-पित्यांना सावध केले जाते की, त्यांनी मुलीवर कधी विश्वास ठेवू नये, चोराप्रमाणे तिच्यावर लक्ष ठेवावे, ती कधीही पिता, बंधु , पुत्र यांची समस्या बनू शकते, जर कधी ती आपली लैगिंक भूक भागविण्यासाठी, शेजाऱ्यांना किंवा वस्तीतील लोकांना विवश करु लागली, तर घराण्याच्या माथी कलंक लावण्यास ती निमित्त बनू शकते.

## ३. हिंदू समाजात हुंड्याची आवश्यकता

हिंदू धर्मग्रंथातील या स्त्रीविषयक विचारसरणीच्या परिणामस्वरूप हिंदू समाजाला आपल्या मुली म्हणजे साक्षात संकट वाटू लागले असावे. म्हणून मुलींचे माता-पिता आपल्या मुलींचा विवाह लवकरात लवकर करण्याचा प्रयत्न करीत असावेत. (आणि कदाचित यामुळेच भारतात मुलींचे विवाह बालपणी करण्याचे सर्वमान्य झाले असावे.) मुलीचे माता-पिता कोणतीही किंमत देऊन या मुलीरूपी आपत्तीपासून सुटका करून घेण्याच्या विवंचनेत राहत असावेत. म्हणून ते मोठ्यात मोठ्या रकमेचा त्याग करण्यासही तयार होत असावेत. दुसरीकडे वरपिता, आणि त्याचे कुटुंबीय, वधूमाता-पित्याची ही विवशता जाणत असल्यामुळे तेही या तथाकथित आपत्तीला आपल्या घराण्याच्या माथी मारून घेण्यास तोपर्यंत तयार होत नसावेत जोपर्यंत आपल्या मागणीनुसार वधूपित्याकडून धनप्राप्ती होत नाही. हुंड्याच्या प्रथेचा उगम या मानसिकतेतून झाला आहे असे दिसून येते.

हिंदू समाजात स्त्रियांविषयी पसरलेले हे विचार आणि दृष्टिकोन हुंड्याची प्रथा सुरू होण्यास व रूजण्यास जबाबदार आहेत. या दृष्टिकोनाने इतकी कीर्ती प्राप्त केली की, देवता आणि भगवान यांनी जेव्हा आपले विवाह केले तेव्हा स्वत: त्यांनीही भरपूर हुंडा घेतला. त्याचप्रमाणे त्यांनी आपल्या बहिणी आणि मुलींची लग्ने केली तेव्हाही हुंडा दिला असल्याचे दिसून येते.

भारतीय समाजात फार प्राचीन काळापासून ही हुंड्याची प्रथा प्रचलित आहे. याची साक्ष हिंदू धर्माचा इतिहास देतो. प्रथम हिंदू समाजातील वैश्य (व्यापारी) हा श्रीमंत समाजघटक या प्रथेने सर्वांत अधिक ग्रासला गेला होता तद्नंतर आजपर्यंत इतर सर्व समाजघटकसुद्धा या प्रथेने

ग्रासले गेले आहेत.

हिंदू समाजात या प्रथेची सुरवात वैदिक काळापासून झालेली होती. तद्नंतर पुराणांच्या काळात त्यास खूप लोकप्रियता प्राप्त झाली. कारण पुराणांमध्ये असंख्य देवदेवतांच्या विवाहाची वर्णने आली आहेत. त्यासोबत या विवाहांमध्ये दिल्या गेलेल्या हुंड्याची संपूर्ण तपशिलासह वर्णने दिली आहेत. यापैकी काही वर्णने पाहणे उद्बोधक ठरेल.

## ४. पुराणामधील हुंडा

### १) पार्वतीचा हुंडा

तुलसीदासांनी 'रामचरित्र मानस'मध्ये शिव आणि पार्वतीच्या विवाहाच्या वर्णनासोबत पार्वतीच्या वडिलांनी पार्वतीला दिलेल्या हुंड्याचे वर्णनसुद्धा केले आहे. त्या वर्णनानुसार, पार्वतीच्या वडिलांनी शिवजींना गुलाम, दासी, घोडे, रथ, हत्ती, गायी, कपडे, हिरे, जवाहीर याशिवाय अनेक वस्तू, धान्य, सोन्याची भांडी इ. गाड्या भरभरून दिली. तात्पर्य, पार्वतीच्या वडिलांनी शिवजींना इतका हुंडा दिला की तो वर्णनापलीकडे आहे.

### २) द्रौपदीचा हुंडा

द्रौपदी आणि पांडवांच्या विवाहप्रसंगी द्रौपद राजाने आपल्या जावयांना दिलेल्या वस्तूंचा तपशील महाभारतात दिला आहे, त्यामध्ये पुष्कळ हिरे, जवाहीर आणि धन दिले. हिरे जवाहिरांनी जडलेल्या वस्तूंचे ढीग होते. उमदा घोड्यांचे शंभर रथ, उत्कृष्ट पेहराव, जवाहिरांनी मढलेल्या शंभर दासी, त्याशिवाय खूप धन, जवाहीर सर्व पाचही पांडव बंधुंना द्रौपद राजाने दिले.

### ३) राजा विराटच्या मुलीचा हुंडा

महाभारतातच अर्जुनाचा पुत्र अभिमन्यूच्या विवाहाचे वर्णनसुद्धा आलेले आहे. राजा विराटने आपल्या जावयास हुंडा म्हणून हवेच्या गतीने धावणारे सात हजार घोडे, दोनशे मस्त हत्ती आणि खूप धन दिले. त्याने आपले राज्य, सेना आणि धन यासोबत स्वत:लासुद्धा जावयास अर्पण केले.

### ४) सुभद्राचा हुंडा

महाभारतात श्रीकृष्ण भगवान यांची बहीण सुभद्राच्या लग्नाचे वर्णन आहे. श्रीकृष्ण भगवानने आपल्या बहिणीच्या विवाहात दिलेल्या हुंड्याचा तपशील आला आहे. सोन्यानी मढविलेले एक हजार रथ, दहा हजार गायी, सोन्यानी सजविलेले पांढरे शुभ्र एक हजार घोडे, पाचशे खच्चर, पाचशे सजविलेले बैल, सोन्याच्या दागिन्यांची सजविलेल्या एक हजार दासी, एक लाख घोडे आणि दहा पुरुषांच्या वजनाइतके सोने हे सर्व हुंडा म्हणून देण्यात आले होते. याशिवाय श्रीकृष्ण भगवान यांनी आपल्या बहिणीला माहुतींसह एक हजार हत्ती दिले होते. या हत्तींच्या गळ्यात सोन्याच्या घंट्या बांधल्या होत्या.

## ५) सीतेचा हुंडा

रामायणात भगवान श्री रामचंद्र आणि सीता यांच्या लग्नाचे वर्णन आहे. या लग्नाच्या वर्णनात राजा जनकने दिलेल्या हुंड्याचा उल्लेख आहे. त्याकडे लक्ष वेधण्यात येत आहे.

वाल्मिकी रामायणात, राजा जनकने आपली कन्यारत्न सीतेच्या लग्नात कित्येक लाख गाई, अगणित गालिचे, करोडो रेशमी आणि सुती पोषाख, दागिन्यांनी सजविलेले पुष्कळ हत्ती, घोडे, रथ आणि पायदळ सैनिक दिल्याचे वर्णन आहे. तसेच शेकड्यांनी मुली आणि सर्वोत्कृष्ट दासीही दिल्या होत्या. याशिवाय एक करोड सोन्याची आणि चांदीची नाणी, मोती आणि मोंघेसुद्धा हुंड्यात दिले होते. हुंड्याची इतकी सर्व मालमत्ता श्री रामचंद्र यांच्या चार बंधुपैकी प्रत्येकाला वेगवेगळी दिली होती. कारण वाल्मिकी रामायणानुसार सर्व बंधुंचे विवाह एकाच वेळी झाले होते.

## ६) सत्याचा हुंडा

श्रीमद भागवत पुराण, भगवान श्रीकृष्ण यांच्या जीवनचरित्राचा परिपूर्ण ग्रंथ आहे. त्यामध्ये भगवान श्रीकृष्ण यांच्या विवाहाचे वर्णन आहे. भगवान श्रीकृष्ण यांचा विवाह सत्याशी झाला होता. या विवाहप्रसंगी जो हुंडा देण्यात आला होता, त्यामध्ये उत्कृष्ट वेश परिधान केलेल्या आणि दागिन्यांनी सजविलेल्या तीन हजार सुंदर दासी, सजविलेल्या दहा हजार गाई, नऊ हजार हत्ती, नऊ लाख रथ, नऊ हजार घोडे आणि घोड्यांच्या शंभरपट गुलाम यांच्या समावेश होता.

भगवान आणि देवतांच्या विवाहप्रसंगी दिल्या गेलेल्या हुंड्याच्या तपशिलाचे वर्णन रामायण, महाभारत आणि श्रीमद भागवत पुराण या हिंदूच्या धार्मिक ग्रंथात आले आहे. हे सर्व ग्रंथ पवित्र असल्याची श्रद्धा सर्व हिंदू समाजात आहे. या सर्व ग्रंथांचे श्रवण, वाचन आणि पारायण प्रत्येक हिंदू मोठ्या भक्तिभावाने श्रद्धापूर्वक करतो. रामायण या ग्रंथाचे तर प्रत्येक घरात पारायण भक्तिभावाने केले जाते. दरवर्षी दसरा आणि दिवाळी या सणामध्ये नाटकरूपात या धर्मग्रंथातील घटना दृश्यरूपात रंगमंचावर दाखविल्या जातात. विशिष्टप्रसंगी रामायणाच्या अखंड पाठाचे आयोजन केले जाते. आपल्या देवी, देवता आणि भगवानांनी त्यांच्या विवाहप्रसंगी भरमसाट हुंडा वसूल केल्याची उदाहरणे जेव्हा हिंदूच्या समोर येत असतील तेव्हा आपणही त्याची अंमलबजावणी करून आपली घरे का भरू नयेत, असा विचार ते करू लागल्यास त्यात नवल नाही. परिणामत: वधूपित्याच्या घराचे दिवाळे का निघेना, विवाहाच्या बदल्यात वधूपित्याकडून जास्तीतजास्त हुंडा वसूल करण्याची वरपित्याची मानसिक तयारी होते. वधूपिता आपल्या मुलीरूपी संकटाला टाळण्यासाठी मोठ्यात मोठा आर्थिक त्याग करण्यास तत्पर असतो. त्या वेळी त्याच्या मनात हा प्रश्न येत नाही की, आपल्या दुसऱ्या मुलीसाठी कोठून पैसे आणावेत. धर्मग्रंथातील स्त्रीविषयक विचारसरणी आणि देवीदेवतांच्या प्रत्यक्ष हुड्यांच्या हकिकती यामुळे दोन्ही पक्षांची (वधूपक्ष आणि

वरपक्ष) हुंडा देण्याघेण्याची मानसिक तयारी होते.

## ५. प्राचीन हिंदू समाजात स्त्रियांची परिस्थिती

सर्व वेद, सर्व पुराणे, मनुस्मृति इ. धर्मग्रंथांमधील स्त्रीविषयक दृष्टिकोन, विचारसरणी आणि उपदेश यामुळे वरपित्याने वधूपित्याकडून भरमसाठ हुंडा वसूल करूनसुद्धा स्त्रियांना कोणताही प्रतिष्ठित दर्जा हिंदू समाजाकडून दिला जाऊ शकला नाही. हजारो वर्षांपूर्वी स्त्रियांचा जो दर्जा होता, थोड्याफार फरकाने तोच दर्जा आजही त्यांना असल्याचे दिसून येते. म्हणून मुहम्मद अशरफ यांनी जेव्हा प्राचीन हिंदू समाजातील स्त्रियांच्या परिस्थितीविषयी संशोधन केले त्यात ते खालील निष्कर्षावर येऊन पोहोचले :

"स्त्रियांची परिस्थिती आणि त्यांना दिलेली कर्तव्ये जाहीररीत्या कमी होती. पुरुषांची सेवा करणे हे त्यांचे मुख्य कर्तव्य होते. जीवनाच्या मैदानातील त्यांची कार्ये पुरुषावर अवलंबून होती. त्यांना आपले जीवन कोणाच्यातरी देखरेखीखाली व्यतीत करावे लागत होते. समाजाचे कायदे, रीतिरिवाज यांनी त्यांच्यावर मानसिक न्यूनगंडाचे शिक्कामोर्तब केले होते. जन्माच्या वेळीसुद्धा त्यांना अनाहूत अतिथी ठरविले होते. कारण हिंदू धार्मिक श्रद्धेनुसार दुर्दैवी मुलगी वडिलांच्या पापांचे क्षालन करू शकत नाही. या कारणास्तव काही समाजघटक मुलींची बालपणातच कत्तल करीत असत. जर ती जीवंत राहिली तर तिला विभक्त न होऊ शकणाऱ्या नात्यामध्ये बांधून टाकून पतीच्या हाती सुपुर्द केले जात असे. गर्भवती असताना जर तिचा मृत्यू झाला तर तिचे भयानक भूत योनीत रुपांतर होत असे, तिला हडळ समजले जाई आणि ती शेजाऱ्यापाजाऱ्यांना त्रास देते असे समजले जाई. स्त्रीचा अंत तिचा मृत्यू किंवा ती सती जाणे यातच होणे शक्य होते. अशा तऱ्हेने स्त्रीचे जीवन जन्मापासून मृत्यूपर्यंत अतिशय भयानक असे. धर्म आणि इतर सुधारणावादी चळवळींनी तिला आपल्या नशिबाशी कृतज्ञ राहण्याचे धाडस दिले होते. परंतु येथेसुद्धा तिला सामर्थ्य, सत्ता आणि अधिकार यापासून वंचित ठेवले जात असे. इतकेच नव्हे तर धर्माच्या बाबतही कोणत्याही प्रतिष्ठित स्थानापासून तिला वंचित राहावे लागे. हिंदूंच्या श्रद्धेनुसार मुलाला जन्म देणे स्त्रीचे सर्वांत महत्त्वाचे कर्तव्य होते."

(हिंदुस्तानी समाज, पृष्ठ २२६-२२७)

प्रकरण ५

# हिंदू समाजात हुंड्यामुळे घडणारे अत्याचार

मागील प्रकरणात, हिंदू समाजात भूतकाळात हुंड्याच्या प्रथेचे स्वरूप कसे होते आणि त्या प्रथेची कारणमीमांसा करण्यात आली आहे. हिंदू धर्मग्रंथांत आणि धार्मिक कायद्यांत स्त्रियांसंबंधीचे विचार किती अत्याचारी, विनाशक दृष्टिकोन प्रचलित होते यासंबंधी वर्णनही मागील प्रकरणात आले आहे.

स्त्रीविषयक अशा तऱ्हेच्या तिरस्कर्णीय दृष्टिकोनाच्या परिणामामुळे वैदिक काळातील हिंदू समाजाने विवाहाचे जे विविध प्रकार प्रचलित केले त्या प्रकारांना कोणताही सुसंस्कृत समाज कबूल करू शकणार नाही. हे प्रकार स्त्रियांसाठी केवळ तिरस्कर्णीय आणि अपमानजनकच नसून त्यामुळे स्त्रियांचे शील आणि पावित्र्यसुद्धा वास्तवहीन होऊन जाते. भारतातील प्रसिद्ध इतिहासतज्ञ वधबानी वैदिक समाजात प्रचलित असलेल्या विवाह प्रकारांचे वर्णन करताना लिहितात, "वेदकाळात विवाहाचे आठ प्रकार प्रचलित होते. यातील एका प्रकारानुसार, स्त्री पूर्णपणे कायमची पत्नी बनत असे. दुसऱ्या प्रकारच्या विवाहात कन्येला नखशिखांत दागिन्यांनी मढवून आणि बऱ्याच वस्तू भेट स्वरुपात देऊन वधूपिता तिला पतीच्या हवाली करत असे. तिसऱ्या प्रकारात विवाहानंतर पतीला कोणत्याही दुसऱ्या आश्रमात प्रवेश करण्याची अनुमती नसे. लग्नाच्या चौथ्या प्रकारात वधूपित्यास वराने एक गाय लग्नाआधी द्यावी लागे जेणेकरून त्या गाईच्या दुधाचा वापर करता यावा. पाचव्या प्रकारात लग्नामध्ये मुलगा मुलीच्या बापाला मुलीची किंमत देऊन मुलीला खरेदी करत असे. विवाहाच्या सहाव्या प्रकारात मुलगा मुलीशी जबरदस्तीने संभोग करून तिला लग्न करण्यास भाग पाडी. सातव्या प्रकारात लढाईत मुलीला कैद केल्यास, त्या मुलीला कैद करणाऱ्याशी विवाह करावा लागे. वेदकाळातील विवाहाच्या आठव्या प्रकारात, मुलगा मुलीवर प्रेम करीत असे. हे प्रेम केवळ नकली नसे, तर व्यावहारिक असे. तद्‌नंतर तिचे लग्न त्या मुलाशी होत असे. वैदिक काळातील समाजात प्रचलित असलेल्या दुसऱ्या प्रकारच्या विवाहविधीमुळे हुंड्याच्या प्रथेस प्रेरणा मिळाली. म्हणून त्या काळात हुंड्याच्या प्रथेने अत्युच्च बिंदू गाठला होता."

(वर्ल्ड हिस्टरी, पृष्ठ ६६, लेखक आर. के. वधवानी)

## १. स्त्रीविषयक तत्त्वज्ञान आणि दृष्टिकोन

वैदिक काळातील हुंड्याच्या प्रथेचे अस्तित्व विचारात घेण्यायोग्य आहे. या काळातील विवाहाच्या विविध प्रकारांशिवाय त्या समाजामध्ये दोन परस्परविरुद्ध लैंगिक तत्त्वज्ञान प्रचलित होते. एकीकडे व्यवहारात अंमलात असलेल्या दृष्टिकोनाचे रुपांतर तांत्रिक शास्त्रात आणि कामशास्त्रात झाले. त्यानुसार स्त्री केवळ लैंगिक समाधानाचे साधन समजली जाऊ लागली. स्त्रीने जास्तीतजास्त लैंगिक सुख द्यावे हे तिच्या जन्मजात कर्तव्यात सामील झाले. दुसरीकडे समाजात हा समजही प्रचलित होता की, प्रत्येक पुरुषाची तीव्र इच्छा होती की, तो

अशा स्त्रीचा पती व्हावा जी सदाचारी असावी आणि त्याच्याशी एकनिष्ठ राहण्याची पात्रतासुद्धा तिच्यात असावी. या दोन परस्परविरुद्ध निकषामध्ये त्या समाजाने स्त्रीला कायम संकटात घेरून टाकले होते.

या परिस्थितीत कोणत्याही मुलीच्या बापाला मुलीच्या भवितव्यासंबंधी चिंताग्रस्त होणे क्रमप्राप्त होते. या प्रकारच्या लैंगिक संकटापासून सुरक्षित ठेवण्यासाठी मुलीचे विवाह बालपणी करण्याची प्रथा रूढ झाली असावी. याशिवाय हिंदू धर्माच्या कायद्यानुसार, प्रत्येक उच्चवर्णीय पुरुष निम्नवर्णीय मुलीशी विवाह करू शकत होता. तथापि ब्राह्मण धार्मिक श्रेष्ठत्वाच्या आधारामुळे सुरक्षित होते आणि क्षत्रिय राज्यकर्ते असल्यामुळे सत्ता-सामर्थ्यामुळे सुरक्षित होते. शुद्रांच्या स्त्रिया अस्पृश्य असल्यामुळे त्याही सुरक्षित असाव्यात. तथापि वैश्यवर्णीय स्त्रिया असुरक्षित असाव्यात. या असुरक्षिततेमुळे वैश्य स्त्रियांचे विवाह लवकर उरकून टाकण्याच्या बेतामुळे वैश्य वर्णामध्ये हुंड्याची प्रथा प्रथम जास्त प्रचलित असावी. आता मात्र या प्रथेने हिंदूंच्या सर्व वर्णांमध्ये पाय पसरले आहेत.

अशा या सामाजिक परिस्थितीत प्रत्येक मुलीचा बाप मुलगी वयात येण्यापूर्वीच तिचे लग्न करण्याचा प्रयत्न करीत असेल, जेणेकरून मुलगी लैंगिक संकटापासून सुरक्षित राहू शकेल. बाप आपल्या मुलीच्या भवितव्यासाठी कोणतीही किंमत मोजून मुलगा खरेदी करण्यास तयार होत असावा. या किंमतीसच हुंडा हे नाव दिले गेले असावे. या खरेदी-विक्रीच्या व्यवहारामुळे मुलगी वयात येण्यापूर्वीच पतीच्या मालकीची होत होती. यामध्ये सर्वांत मोठा फायदा हा होता की, वैश्य वर्णातील मुलीचे वैश्य वर्णातील मुलाशी लग्न ठरत असे. मुलीच्या बापासाठी हाच मोठा गौरव होता.

## २. मनुस्मृतीचा कायदा

उपर्युक्त कारणमीमांसा समजण्यासाठी मनुस्मृतीचे खालील श्लोक लक्षात घ्यावे लागतील.

१. "जर शुद्र पुरुष, सवर्ण जातीच्या स्त्रीशी मैथुन करील तर त्याला मृत्यूदंडाची शिक्षा दिली पाहिजे." (मनुस्मृती, ८-३५९)

२. "उच्चवर्णीय पुरुषाशी संभोग करण्याच्या हेतुने शुद्र मुलगी त्या पुरुषाची सेवा करीत असेल, तर तिला कोणतीही शिक्षा देऊ नये. परंतु निम्नवर्णीय पुरुषाजवळ जाणाऱ्या उच्चवर्गीय स्त्रीला कायद्यानुसार कडक कारवाई करण्यात यावी." (मनुस्मृती, ८-३६६)

३. "उच्चवर्णीय मुलीशी संभोग करणारा निम्नवर्णीय पुरुष कत्तल करण्यालायक असतो." (मनुस्मृती, ८-३६६)

४. "क्षुद्राने आपल्याच जातीच्या मुलीशी विवाह केला पाहिजे, त्याला दुसऱ्या वर्णाच्या स्त्रीशी विवाह करण्याचा अधिकार नाही." (मनुस्मृती, ९-१५७)

मनुस्मृतीच्या या कायद्याचे मनन केल्यास, स्त्रियांचा प्रवाह निम्नवर्णाकडून उच्चवर्णाकडे होत असे, हे लक्षात येते. शुद्रवर्ण जरी गलिच्छ म्हणवला जात असे, तो अशुद्ध, मलीन आणि अस्पृश्यही होता. असे असूनसुद्धा त्या वर्णाच्या स्त्रियांशी शरीरसंबंध शुद्ध ठरविले गेले होते. शुद्र स्त्रियांशी एकीकडे घृणा उत्पन्न होणे नैसर्गिक बाब होती. ब्राह्मण वर्ण धार्मिक श्रेष्ठत्व धारण करणारा होता आणि क्षत्रिय वर्ण शूरवीर राजकर्ता होता. अशा परिस्थितीत दोन्ही उच्चवर्णासाठी स्त्रियांचा पुरवठा वैश्य वर्णातून होत असावा.

हिंदू समाजातील वैश्य वर्णावर समाजाच्या भौतिक गरजा पुरविण्याची आणि धन प्राप्त करण्याची जबाबदारी होती. म्हणून त्या वर्णात धनाची दैवी लक्ष्मीच्या नावाने तिची आराधना करणे सुरु झाले. त्यासाठी दिवाळी सण खास ठरविला गेला. परिणामत: मानवाची सेवक असलेली धनदौलत देवी बनून मानवाची मालक बनली. त्यामुळे जास्तीतजास्त धन कमविणे हे जीवनाचे मुख्य ध्येय ठरले गेले. धनाचा लोभ इतका वाढला की, वरपित्याने आपल्या सुपुत्रास व्यापाराची वस्तू बनविली आणि मागेल त्या किंमतीवर त्याची खरेदी विक्री सुरु झाली.

## ३. आधुनिक भौतिकवादी हुंड्याची प्रथा

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर भारतात जेव्हा शिक्षणाला सर्वसामान्य करण्याची पावले उचलली गेली, तेव्हा पाठ्यक्रमाच्या नावावर पाश्चिमात्य दृष्टिकोन जसाचातसा शिकविणे सुरु झाले. हा पाश्चिमात्य दृष्टिकोन जीवनाच्या केवळ भौतिकवादी विचारावर आधारित होता. त्यानुसार या शिक्षण पद्धतीमुळे भारतातील नव समाजाची जीवन पद्धत भौतिकवादी साच्यामध्ये निर्माण होऊ लागली. त्यामुळे आधुनिक समाजाचा तात्विक पाया भौतिकवादी विचार झाल्याने तो समाज केवळ धनपूजक बनला आणि त्या समाजाची नैतिकता, माणुसकी आणि आध्यात्मापासून पूर्णपणे फारकत झाली. परिणामत: जसजशा भौतिक गरजा वाढू लागल्या, तसतसे हुंड्याच्या नावावर विवाह इच्छुक मुलांच्या किंमतीही वाढत जाऊ लागल्या. आता तर या समस्येने हिंदू समाजामध्ये सतत वाहणाऱ्या जखमेचे (नासूर) स्वरुप धारण केले आहे.

उदाहरणार्थ, नवी दिल्लीत हुंडाविरोधी आयोजित केलेल्या एका रॅलीच्या प्रदर्शनात निरनिराळ्या विवाह इच्छुक मुलांच्या (वरांच्या) हुंड्याच्या दरांची यादी लावली होती. ती खालीलप्रमाणे आहे :

| | मूलाचे पद | हुंडयाचा दर |
|---|---|---|
| १. | आय.ए.एस. | चार लाख रुपये |
| २. | इंजिनीयर | साडेतीन लाख रुपये |
| ३. | डॉक्टर | तीन लाख रुपये |
| ४. | एम. ए. | एक लाख रुपये |
| ५. | एम.ए.नापास | पन्नास हजार रुपये |
| ६. | बी.ए.नापास | पंचविस हजार रुपये |

| | | |
|---|---|---|
| ७. | मॅट्रिक | दहा हजार रुपये |
| ८. | शासकीय अधिकारी | पंचावन्न हजार रुपये |
| ९. | खाजगी कंपनीतील अधिकारी | चाळीस हजार रुपये |

- सह रोजा दावत, ७ ऑगस्ट १९८२

याप्रमाणे, राहणीमानाचा दर्जा (Standard of living) जसा वाढत जाईल तसे समाजातील विवाह इच्छुक वर मुलांच्या हुंड्याच्या दरात वेगाने वाढ होत जात आहे. याविरुद्ध कायदे (हुंडा प्रतिबंधक कायदा २००५) सुद्धा होत आहेत. नैतिक आव्हानेसुद्धा केली जात आहेत. सुधारणावादी संस्थासुद्धा कार्य करीत आहेत आणि स्त्रियांकडून सुद्धा त्याविरुद्ध आवाज उठविला जात आहे. परंतु हुंड्याच्या वाढत जाणाऱ्या प्रवृतीवर या सर्वांचा काहीही परिणाम होताना दिसत नाही.

## ४. हुंड्यासाठी स्त्रियांवर होणारे अत्याचार

भूतकाळात लग्न ठरविले जात असतानाच हुंड्याचा सौदासुद्धा निश्चित केला जात असे. मग एकदा हुंडा दिल्यानंतर मुलीचे वैवाहिक जीवन शांती आणि सुखाने व्यतीत होत असे, परंतु भौतिकवादाच्या पाश्चिमात्य आक्रमणामुळे धनपूजेच्या प्राचीन संवेदना जागृत झाल्यामुळे अलीकडे लग्नानंतरसुद्धा विवाहित स्त्रीकडे नित्य नव्या मागण्या करणे सुरु झाले आहे. आता विवाहितेच्या सासुरवाडीतील सर्व लोक (सासू, सासरे, नणंद, दिर इ.) आणखी अधिक हुंड्याची रक्कम विवाहितेच्या वडिलांकडून आणण्यासाठी विवाहित महिलेचे छळ करीत आहेत. या मागण्यांमुळे घरामध्ये एक प्रकारचा संघर्ष निर्माण होऊ लागला आहे. भांडणतंटे तर जोरात होत असतातच, शिवाय विवाहित महिलेला मारहाण करेपर्यंत मजल जाते. परिणामत: छळाला कंटाळून कधीकधी या स्त्रिया आत्महत्या करतात, तर कधीकधी सासुरवाडीतील लोक सुनेला जाळून राख करीत आहेत.

हुंडाबळी पडलेल्या विवाहित स्त्रियांसंबंधी शासकीय आकडेवारी संसदेच्या वेगवेगळ्या अधिवेशनात मांडली जात असते. नॅशनल क्राईम ब्रँचने ही आकडेवारी जमविली आहे. ती आकडेवारी खालीलप्रमाणे आहे :

| इसवी सन | हुंडाबळी | माध्यम |
|---|---|---|
| १९७५ ते १९७८ | ५२४५ | सह रोजा दावत १६-७-१९८७ |
| १९७९ | १०५६ | सह रोजा दावत ४-३-१९८३ |
| १९८३ | २३२ | सह रोजा दावत १-४-१९८४ |
| १९८५ | ६३७ | सह रोजा दावत २८-११-१९८७ |
| १९८६ | १३१९ | सह रोजा दावत २८-११-१९८७ |
| १९८७ | १९१२ | सह रोजा दावत ७-७-१९९५ |

| | | |
|---|---|---|
| १९८८ | २२०९ | नई दुनिया २६-७-१९९१/१-८-१९९१ |
| १९८९ | ४००० | नई दुनिया २६-७-१९९१/१-८-१९९१ |
| १९९० | ५१५७ | नॅशनल क्राईम ब्रॅंच आणि दावत ७-७-१९९५ |
| | | (नोट - १ ऑगस्ट १९९१ च्या बी.बी.सी. नुसार १९८८ ते १९९० या कालावधीत ११००० हुंडाबळी पडले) |
| १९९३ | १९३२ | दावत, १०-८-१९९५ |
| १९९४ | ४८५० | शासकिय आकडेवारी |
| | | (नोट - १९९४ मध्ये दररोज १७ हुंडाबळी पडले) |

उपरोक्त आकडेवारी नोंद केलेल्या हुंडाबळींची आहे. तथापि नोंद न केलेले हुंडाबळी यापेक्षा अधिक असावेत ती आकडेवारी वरील आकडेवारी मिळविली गेल्यास ही बाब किती भयानक आहे, हे लक्षात येईल.

स्त्रीविषयी धर्माने दिलेली चुकीची विचारप्रणाली, तसेच उपदेश, सिद्धान्त आणि धार्मिक ग्रंथांत वर्णन केलेली हुंड्याची वर्णने त्यामुळे हिंदू समाजातील स्त्रियांवर मोठ्या प्रमाणात अत्याचार होत आहेत आणि चुकीच्या विचारसरणीमुळे मौल्यवान तरूण नववधू आगीच्या भक्ष्यस्थानी पडत आहेत. जोपर्यंत हे दृष्टिकोन जीवंत आणि दृढ आहेत तोपर्यंत मानवी जिवांचा विध्वंस होत राहील. याला कोणताही कायदा रोखू शकणार नाही किंवा कोणतेही नीतीविषयक प्रवचन यावर परिणाम करू शकणार नाही. रोगांच्या मूळ कारणांचे रक्षण करून कधीही कोणत्याही रोगाचा इलाज होत नाही, आला नाही किंवा कधीही होऊ शकणार नाही.

## ५. एक धोकादायक प्रवृत्ती

मुलींच्या जन्मापासूनच, मातापित्याच्या मनात ती मुलगी परक्याची धन होणार असल्याचा विचार घर करून राहतो. त्यामुळे मुलीच्या पालनपोषणावर, शिक्षणावर, शिष्टाचार व सभ्यता शिकविण्यावर जो काही खर्च केला जात आहे आणि जो काही त्रास सोसावा लागत आहे, ते सर्व भावी जावयाच्या सेवेसाठी केला जात आहे आणि त्याचे घर संपन्न करण्यासाठी केला जात आहे, याची जाणीव मुलीच्या मातापित्यांना असते. ईश्वराने जर माणसाच्या मनात आपल्या अपत्याविषयी वात्सल्य निर्माण केले नसते, तर कोणत्याही व्यक्तीने कोणत्याही मुलीच्या पालनपोषणाचा खर्च आणि त्रास सहन केला नसता. परिणामी समाजात स्त्रियांचे अस्तित्वच मिटून गेले असते आणि सामाजिक नैतिकतेची गरज संपून गेली असती. आपण एखाद्याच्या मुलीच्या सहाय्याने आपले घर संपन्न करतो, तर आम्हाला एखाद्याचे घर संपन्न करण्यासाठी आपल्या मुलीचे पालनपोषण केले पाहिजे, असे विचार सामाजिक नैतिकतेसाठी आवश्यक आहेत. तथापि, हुंड्याच्या चढत्या मागण्यामुळे मुलीबाबत अपत्याचे नैसर्गिक वात्सल्य आणि सामाजिक नैतिक निकड नष्ट होत आहे. म्हणून मुलीला जन्मत:च नापसंद केले जात आहे.

## ६. स्त्रीभ्रूण हत्या

स्त्री गर्भवती झाल्यानंतर गर्भजल चिकित्सा, सोनोग्राफी इ. आधुनिक तंत्राच्या साह्याने तिची तपासणी करण्यात येऊन, जन्मणारे अपत्य मुलगा आहे का मुलगी हे जाणून घेतले जाते. मुलगी असेल तर गर्भपात करण्यात येऊ लागले. या गर्भपातामुळे गर्भवतीवर काय परिणाम होईल याची पर्वा केली जात नाही. आजच्या प्रगत विज्ञानाने इतकी प्रगती केली आहे की, गर्भवतीचा गर्भ मुलगा आहे का मुलगी हे सांगता येऊ लागले आहे. मुलगी असेल तर गर्भाची वाढ होण्यापूर्वी गर्भपात केला जातो. भारत सरकारने अशा तऱ्हेची लिंगपरीक्षण तपासणी करण्यास बेकायदेशीर ठरविले आहे. परंतु हुंड्याच्या भीतीमुळे मुलींना जन्मण्यापूर्वी मारण्याच्या घटना संपूर्ण देशभर वाढत आहेत. उदाहरणार्थ, एका अहवालानुसार, दक्षिण भारताच्या काही राज्यांत दूध पिणाऱ्या तान्ह्या बालकांना ठार मारण्याची प्रथा नष्ट तर झालेली नाहीच, उलट ती प्रथा वाढत चालली आहे. एका निरीक्षण अहवालानुसार (इंडियन एक्स्प्रेस) दक्षिणेकडील राज्यांमध्ये विशेषकरून तामिळनाडू राज्यातील सीलम जिल्ह्यामध्ये ५१% टक्के कुटुंबांत मुलींच्या जन्मानंतर एक आठवड्याच्या आत तिला ठार केले जाते. कारण या मुलींच्या आई-बापाची मुलीच्या लग्नासाठी चाळीस ते साठ हजार रुपयांचा हुंडा देण्याची ऐपत नसते. निरीक्षणानुसार, मुलींना ठार मारणारे सर्व माता-पिता हिंदू समाजाचे असतात. काही प्राप्त अहवालानुसार, मुलींना जन्मत:च विषाचे थेंब त्यांच्या तोंडात घातले जातात किंवा माता त्यांना दूध पाजतच नाहीत, त्यामुळे भुकेने त्या मरून जातात. काही अहवालानुसार, काही माता नवजात मुलींना कडक उन्हात किंवा जीव घेण्यासाठी थंडीत उघड्यावर टाकून, त्या मुलींपासून मुक्तता मिळवितात. माता-पित्याची आर्थिक साधनसंपत्ती मुलीच्या हुंड्याची पूर्तता करू शकत नाही, केवळ या सबबीवर ही अमानुष कृत्ये केली जात आहेत.

## ७. गर्भपात

बहुसंख्य लोकांच्या मते मुलींचा जन्म झाल्यास त्यांना द्याव्या लागणाऱ्या हुंड्याच्या बोज्यामुळे गर्भपात केले जातात. या गर्भपातामुळे चुकीच्या लिंगनिदानानुसार बरेचसे मुलगेही मारले जात आहेत, हेही एक कटू सत्य आहे.

रामी छाब्रा आणि सील सीनुमा यांनी भारतातील गर्भपाताचा सर्व्हे केला होता, त्याचा अहवाल स्त्रियांचे प्रसिद्ध मासिक 'फेमिना' ने आपल्या एप्रिल १९९५ च्या अंकात प्रकाशित केला होता. त्या अहवालानुसार, भारतात दरवर्षी एक कोटी बारा लाख गर्भपात केले जातात, त्यामुळे दरवर्षी वीस हजार स्त्रिया मृत्यूमुखी पडतात. त्या अहवालात, एक हजार जन्मणाऱ्या मुलामागे ४६२ गर्भपात होतात, असे खासकरून सांगितले आहे. म्हणजे भारतात जन्मणाऱ्या दोन मुलांमागे एक गर्भपात होतो.

हुंडारूपी वधस्थळावर दरवर्षी वीस हजार माता आणि एकूण जन्मणाऱ्या मुलांच्या निम्म्या

मुलांचा बळी दिला जातो, असे या आकडेवारीवरून दिसून येते. जीवंत जाळण्यात येणाऱ्या तरूण नववधूंची संख्या त्याव्यतिरिक्त आहे.

समाजाची ही प्रवृत्ती अतिशय विध्वंसक आहे. त्यामुळे समाजातील स्त्रियांची संख्या अतिशय कमी होण्याचा धोका निर्माण झाला आहे. परिणामी स्त्रियांना जबरदस्तीने प्राप्त करण्यासाठी होणारे गुन्हेच केवळ वाढणार नाहीत, स्त्रियांविरुद्धच्या एकूण गुन्ह्यांची संख्याही बेसुमार वाढण्याचा धोका निर्माण होईल, स्त्रियांच्या कमी होणाऱ्या संख्येविषयी खालील माहितीचे अवलोकन करावे :-

| जनगणना | ठिकाण | मुलगे | मुली |
|---|---|---|---|
| १९९१ | महाराष्ट्र | १००० | ९४६ |
| २००१ | महाराष्ट्र | १००० | ९१३ |
| | सांगली | १००० | ७९५ |
| | हरयाणा | १००० | ४५२ |

(उपरोक्त आकडेवारी अनुवादकाने दिली आहे)

याविरुद्ध जे लोक आपल्या मुलींना जीवनाचा हक्क देतात, त्यांच्या जन्माबरोबर हुंडा देता यावा म्हणून योग्य-अयोग्य शास्त्र संमत, निषिद्ध, कायदेशीर, बेकायदेशीर मार्गाने संपत्ती मिळविण्यात आणि संपत्तीचे जतन करण्यात गुंग होतात. त्यामुळे समाजात लाचलुचपत, साठेबाजीसारखे गुन्हे वाढतात. अन्नधान्य, केरोसीन वगैरेसारख्या जीवनावश्यक वस्तूंचा कृत्रिम तुटवडा निर्माण करून त्यांच्या किंमती वाढविणे, आरोग्यवान शुद्ध वस्तूमध्ये भेसळ करण्याची प्रवृत्ती इ. समाजविघातक प्रवृत्ती वाढून नैतिक, सामाजिक आणि आर्थिक गुन्हेगारीमध्ये वाढ होते आणि संपूर्ण समाजाला त्याची शिक्षा भोगण्यास विवश केले जाते.

हे नैतिक, सामाजिक आणि आर्थिक गुन्हेगारी रोखण्यास कायदे किंवा नैतिक प्रवचने आणि उपदेश उपयोगी पडत नाहीत.

प्रकरण ६

# मुस्लिम समाजात हुंड्याच्या प्रथेचा शिरकाव (कारणमीमांसा)

हिंदू धर्मातील स्त्रिविषयक विचारसरणी किती तिरस्कारयुक्त, अपमानजनक आहे यासंबंधीचे विवेचन मागील प्रकरणात आले आहे. तसेच पुरुषांपेक्षा स्त्रियांची कामवासना आठपट असते, असे सांगून समाजात तिला कशाप्रकारे दबावाखाली ठेवण्याची व्यवस्था कशी करण्यात आली आहे, हेसुद्धा मागील प्रकरणात स्पष्ट झाले आहे. हिंदू समाजात हुंडा मागण्याची प्रवृत्ती कोणत्या आधारावर निर्माण झाली आहे, हेसुद्धा ज्ञात झाले आहे. भगवान आणि देवतांनीसुद्धा किती मोठ्या प्रमाणावर हुंडा घेतला आहे किंवा दिला आहे. रामायण, महाभारत आणि भागवत पुराण कशा प्रकारे हुंडा मागण्याच्या प्रवृत्ती सर्व सामान्य करण्यात आणि त्यास प्रोत्साहन देण्यात मूलभूत भूमिका कशा पार पाडत आहेत हेसुद्धा मागील प्रकरणावरून माहीत झाले आहे. हिंदू समाजामध्ये हुंड्याच्या प्रथेमुळे स्त्रीला जीवन जगणे अशक्य करून ठेवले आहे आणि मुलीच्या बाबतीत घृणा निर्माण करण्यास कारणीभूत कसे झाले आहे हे मागील प्रकरणात स्पष्ट झाले आहे. म्हणून जन्मण्यापूर्वीच स्त्रीभ्रूणहत्या केली जात आहे आणि जर स्त्री जन्माला आलीच तर तिला मृत्यूच्या दाढेत ढकलले जात आहे.

## १. इस्लामची स्त्रीविषयक विचारसरणी

हिंदू समाजातील ही हुंड्याची प्रथा आणि त्याचे धार्मिक ग्रंथातील उघडउघड शिक्षण यांच्या परिणामामुळे प्रत्यक्ष भगवान आणि देवतासुद्धा आकृष्ट झाल्याशिवाय राहिल्या नाहीत. परंतु सरतेशेवटी मुस्लिम समाजालासुद्धा या प्रथेने आपल्या कक्षेत कसे ओढून घेतले, ही बाब आश्चर्यजनक आहे. कारण इस्लाममध्ये पुरुष आणि स्त्री बरोबरीच्या नात्याने ईश्वराचे दास आहेत. इस्लाम मूलभूत उपदेशानुसार, स्त्री ही पुरुषाच्या शरीराच्या एका भागापासून बनविली गेली आहे. म्हणून तीसुद्धा प्रतिष्ठेच्या दृष्टीने कोणत्याही प्रकारे गौण नाही. काही बाबींवर श्रद्धा ठेवल्याशिवाय कोणीही मुस्लिम होऊ शकत नाही. स्त्री आणि पुरुष समान आहेत हीसुद्धा त्यातील एक श्रद्धा आहे. स्त्रीने ज्या ग्रंथातून उपदेश प्राप्त करण्याची मागणी इस्लाम करतो त्याच ग्रंथातून पुरुषांनीसुद्धा उपदेश प्राप्त करण्याची मागणी इस्लामी करतो. स्त्रीसुद्धा त्याच आज्ञा पाळण्यास वचनबद्ध ज्या पाळण्यास पुरुष वचनबद्ध आहे. अंतिम निवाड्याच्या दिवशी स्त्रीला पुरुषाप्रमाणे पुन्हा जीवंत केले जाईल आणि तिच्या व त्याच्या वैयक्तिक कर्मानुसार त्या दोघांचाही हिशोब केला जाईल. त्या दिवशी ईश्वराच्या न्यायालयात स्त्रीच्या कर्मानुसार तिला स्वर्ग किंवा नरकामध्ये प्रवेशाचा निर्णय दिला जाईल, ज्याप्रमाणे पुरुषाच्या बाबतीत निर्णय दिला जाईल. तात्पर्य इस्लाममध्ये स्त्री आणि पुरुष हे

मानव असण्याच्या नात्याने मुळीच काही फरक नाही.

याबरोबर इस्लामने पहिल्या प्रथमच घोषित केले आहे की, स्त्री ही पुरुषाच्या शारीरिक तुलनेत दुर्बल असते (तुच्छ नाही.) तिची ही दुर्बलता तिच्यासाठी चांगली बाब सिद्ध झाली आहे. या घोषणेनंतर समाजामध्ये स्त्रियांची जी कर्तव्ये ठरविली आहेत, तिची दुर्बलता, नैसर्गिक घडण आणि शारीरिक कार्यक्षमता यांच्याकडे प्रेमाने लक्ष देण्यात आले आहे आणि त्यांची विचारपूर्वक काळजी घेण्यात आली आहे. तिच्यावर ज्या जबाबदाऱ्या सोपविण्यात आल्या आहेत, त्या जबाबदाऱ्या पार पाडताना तिला या बाबींचे साह्य होते, त्या जबाबदाऱ्या असह्य होत नाहीत, तिच्या जीवनात सुख आणि समृद्धी निर्माण होते आणि कठोर परिश्रमापासून तिची मुक्ती होते. तिच्याशी निष्ठापूर्वक सहकार्य करावे, तिच्याशी सहानुभूतीने वागावे, असा उपदेश पुरुषाला करण्यात आला आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या निवेदनात आदेश दिला आहे की, स्त्री आदमच्या बरगडीपासून बनविली आहे, जर तिला (वक्र बरगडीला) सरळ करण्यासाठी जोरजबरदस्ती कराल तर ती (स्त्री) वक्र बरगडीसारखी असल्यामुळे ती मोडून पडेल. स्त्रीला शारीरिक आणि लैंगिक बळजबरीपासून वाचविण्यासाठी इस्लाम तिला बुरखा वापरण्याचा आदेश देतो. इस्लामने स्त्रीच्या पतीवरसुद्धा बंधन घातले आहे, जोपर्यंत प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलेले चार साक्षीदार अस्तित्वात नसतील, तोपर्यंत पुरुष आपल्या पत्नीवर व्यभिचाराचा आरोप करू शकत नाही. तसे त्याने केल्यास त्यास पत्नीपासून वंचित केले जाईल आणि ८० कोडे मार खाण्याची शिक्षाही त्याला दिली जाईल. इस्लाम स्त्रीच्या शारीरिक दुर्बलतेला मान्यता देऊन तिला अमर्याद संरक्षण देतो. त्यामुळे स्त्री सुख, शांती, संतोष आणि समाधानाच्या हिंदोळ्यात जीवनभर झुलत राहते. कुटुंबव्यवस्था चांगल्या तऱ्हेने चालविण्यासाठी पुरुषाला इस्लामने कुटुंबप्रमुख अवश्य बनविले आहे, तथापि त्यात अमर्याद चातुर्य लपलेले आहे. स्त्रीला गौणत्व दिल्याचा त्यात लवलेशसुद्धा नाही.

स्त्रीचा तिरस्कार, तिच्याविषयी घृणा तिच्याबद्दल तुच्छता, तसेच स्त्री लबाड, चलाख आणि व्यभिचारी असते, अशा तऱ्हेचे विचार हुंड्याच्या प्रथेच्या मुळाशी आहेत. उपरोक्त परिच्छेदात इस्लामने स्त्रीला दिलेल्या प्रतिष्ठेचे वर्णन आले आहे. अशा परिस्थितीत इस्लामला मानणारे आणि त्याच्या सत्यतेवर विश्वास व श्रद्धा ठेवणारे मुस्लिम हुंड्याच्या प्रथेला कसे कबूल करतात आणि आपल्या समाजात त्या प्रथेला शिरकाव कसे करू देतात, याचे सखेद आश्चर्य वाटते.

## २. प्रथेस अंमलात आणणारे लोक आणि कारणमीमांसा

### (१) भारतीय समाजाची स्वभाववैशिष्ट्ये

हुंड्याच्या या समस्येसंबंधी विचार करण्यापूर्वी भारतीय समाजाचे मानसशास्त्रीय विश्लेषण केले जावे, त्या समाजाच्या नैसर्गिक प्रवृत्तींचा बारकाईने विचार केला जावा. भारतातील सर्वसामान्य लोक कधीही तात्त्विक आधारावर एकत्र येत नाहीत, असे या देशाच्या इतिहासाच्या अभ्यासावरून दिसून येते. उलट बहुतांशी जनता धार्मिक श्रद्धेच्या आधारे एकत्र येत असल्याचे दिसून येते. एखाद्या व्यक्तीविषयी श्रद्धा निर्माण करण्यासाठी त्या व्यक्तीविषयी अतिरंजित दंतकथा पसरविल्या गेल्यास आणि सर्वसाधारण समाजात त्या व्यक्तीच्या चमत्कारांची चर्चा केली गेल्यास जनता स्वयंघोषित भगवान, देवी, देवता आणि तथाकथित साधू संताभोवती गर्दी करते. भारतीय जनतेचा हा स्वभाव आजसुद्धा अस्तित्वात आहे. म्हणून या देशातील धार्मिक संघटना असोत किंवा राजकीय संघटना असोत, प्रत्येक संघटनेमध्ये त्याच्या संस्थापकांच्या कतृत्वामुळे लोक एकत्र येतात. तथापि त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या वारसदारांचे कर्तृत्व असो व नसो लोक त्या पहिल्या संस्थापकांच्या नावावर एकत्र येतात. ही एक प्रकारची विभूतीपूजा आहे.

### (२) सूफी संत आणि धर्मप्रचार

भारतीय समाजाच्या याच स्वभाववैशिष्ट्यामुळे सूफी संताना इस्लामचा उत्कर्ष करता आला. तथापि असा उत्कर्ष इस्लामी विद्धानांनासुद्धा प्राप्त करता आला नाही. काही मुस्लिम विद्धानांना यश मिळाले असले तरी त्यांनाही त्याकरिता सूफी पंथाच्या तत्त्वज्ञानाचा डगला चढवावा लागला आहे.

उदाहरणार्थ, या देशात सर्वप्रथम माननीय मुईद्दीन चिश्ती अजमेरी यांचे आगमन झाले आणि त्यांनी संपूर्ण देशभर आपल्या प्रतिनिधींना धर्मप्रचार कार्यावर नियुक्त केले. त्याप्रमाणे माननीय फरीदुद्दीन गंज शकर, माननीय मखदुम बुखारी, माननीय इस्माईल बुखारी, माननीय बहाउल हक जकरिया मुलतानी, माननीय सय्यद सदुद्दीन आणि माननीय हसन कबीरुद्दीन यांनी पंजाबमध्ये भावलपूर भागात, पूर्व सिंधमध्ये सय्यद जलालुद्दीन बुखारी आणि सईद यूसुफुद्दीन यांनी, कच्छ आणि गुजरातमध्ये माननीय इमाम शाह पैरानवी आणि माननीय मलिक अब्दुल लतीफ यांनी, बंगालमध्ये शेख जलालुद्दीन तबरेजी यांनी, आसाममध्ये शेख जलालुद्दीन फारशी यांनी, काश्मीरमध्ये माननीय बुलबुल शाह असीर अली हमदानी आणि सईद शाह फरीदुद्दीन यांनी, कोकण भागात पीर महाबीर खमदायत यांनी, धारवाडमध्ये माननीय हाशिम गुजराती यांनी धर्मप्रचार धुमधडाक्याने केला. याशिवाय दक्षिणेतच माननीय बंदानवाज

गैसुदराज, शेख बुऱ्हानुद्दीन, माननीय शेख जैनुद्दीन आणि औरंगाबादचे माननीय निजामुद्दीन यांनी धर्मप्रचाराची जबाबदारी आपापल्या भागात पार पाडली.

उपरोल्लेखित प्रतिष्ठित सूफी संतानी आणि त्यांच्यासारख्या असंख्य संतांनी या देशात इस्लाम प्रचारासाठी जबरदस्त सेवा केली आणि त्यात त्यांना असामान्य यशही प्राप्त झाले. या प्रतिष्ठित संतांच्या आत्मिक बलाबरोबरच त्यांची प्रेमळ वागणूक, नि:स्वार्थी वृत्ती, मानवी कळवळ्याची भावना, लोकांना यश व लाभ मिळवून देण्याची धडपड या सर्वांचा त्यांच्या यशामध्ये मोलाचा वाटा आहे. तसेच भारतीय समाजाची विशिष्ट मानसिकता, प्रवृत्ती आणि स्वभाव यांचाही या यशात मोठा वाटा आहे.

या सूफी संतांचे आश्रम असत. या आश्रमात प्रतिष्ठित सूफी संत धर्मगुरू म्हणून केंद्रस्थानी विराजमान असत. लोक त्यांच्याकडे श्रद्धापूर्वक आश्रमात येत. येथे शेख (धर्मगुरु) उच्चस्थानावर आसनस्थ होऊन उपस्थितांना संबोधून उपदेश करीत असत, हिंदूंच्या मठातल्याप्रमाणे उपदेश करणाऱ्यांचे आणि उपस्थितांचे संबंध पिता-पुत्रासमान असत. मठात ज्याप्रमाणे आत्मा-परमात्मासंबंधी ऐकावयास मिळत असे, तसेच येथेही ऐकावयास मिळे. तसेच येथे गुरु-शिष्यामधील संभाषण सात्विक आणि रहस्यमय असे. मठात जसे चमत्काराच्या गोष्टी ऐकावयास मिळत, तसेच येथे साक्षातकारी व्यक्तींच्या चमत्कारांची चर्चा होत असे. मठात, देवी, देवता आणि साधूसंताच्या वार्षिक यात्रा आयोजित होत, तसेच या आश्रमातही मुस्लिम संतांचे उरूस साजरे करण्याची परंपरा होती. तात्पर्य, लोकांचे स्वभाव, प्रवृत्ती आणि मानसिकता यांना अनुसरून संतोष, समाधान आणि मनशांती मिळण्याची सर्व साधने मठातल्याप्रमाणे सूफी संताच्या आश्रमातही उपस्थित होती, त्यामुळे आश्रमांत येणाऱ्यांची श्रध्दा दिवसेंदिवस वृद्धिंगत होत असे. आश्रमातील सर्व साधनांची रुपे इस्लाममय असत. याशिवाय येथे उपस्थितांना आपुलकी, कारुण्य, मनमोकळेपणा, मनमिळावू इ. नी ओतप्रोत वागणूक मिळत असे. तसेच सूफी तत्त्वज्ञानात रंगलेले भक्तिमार्गाचे इस्लामी शिक्षण आश्रमात मिळत असे, त्यामुळे लोक भारावून जात आणि समुदायाने इस्लामचा स्वीकार करीत.

सूफी संतांच्या या आश्रमांत नवमुस्लिमांना सूफी परंपरेचे तत्त्वज्ञान, जपजाप्य, मंत्रतंत्र, रीतिरिवाज यांचे शिक्षण दिले जाई. तसेच ज्येष्ठ सूफी संतांवरील श्रद्धेत वृद्धी केली जाई. इस्लामी तत्त्वज्ञान आणि इस्लामी श्रद्धा अमलात आणण्याचे बारकावे यासंबंधी टीका-टिप्पणी, भाष्य केले जाई. तसेच पवित्र कुरआन आणि हदीसचे शिक्षण दिले जाई. तथापि हे सर्व एकप्रकारे एकांगी होत असे. नवमुस्लिम यांच्या मूळ समाजातील समाजधारणा, पापपुण्य, नीतिनियम, सदाचार यांच्या कल्पना तसेच सांस्कृतिक रीतिरिवाज आणि प्रथांना इस्लामनुसार बदलण्याच्या कोणत्याही सोयी आश्रमात उपलब्ध नसत. हे कार्य उलेमांचे (मुस्लिम विद्वानांचे) आहे, असे समजले जाई. परंतु उलेमांनी यात लक्ष घातले नाही असे आरोप होत. परिणामी सूफी आणि

उलेमांमध्ये संघर्षाला तोंड फुटले, त्यामुळे नवमुस्लिमांवर विपरित परिणाम झाले. ते केवळ आश्रमातील एकांगी शिक्षणावर अवलंबून राहिले.

परिणामत: नवमुस्लिमांच्या मूळ समाजातील अज्ञानी, अशिष्ट, अनिष्ट असे बरेचसे विचार, रीतिरिवाज, प्रथा इ. नवमुस्लिमांत तशाच राहिल्या. त्यामध्ये स्त्रियांना कमी लेखणे, स्त्रिविषयक उपेक्षावृत्ती, स्त्रियांविषयी घृणा, तिरस्कार, तुच्छता यांचा समावेश आहे. स्त्री ही पायाखाली ठेवण्याची वस्तू आहे. स्त्रीला पायताण समजणे, तिला दासी-गुलाम म्हणून वागविणे हे सर्व अनिष्ट विचार नवमुस्लिमाबरोबर आले. याशिवाय मूळ समाजातील अनेक रीतिरिवाज, प्रथा, रूढीसुद्धा नवमुस्लिमांबरोबर आल्या. त्यात हुंड्याच्या प्रथेचाही समावेश आहे. कोणतेही श्रम न करता, कोणताही जीवन संघर्ष न करता एका रात्रीत श्रीमंत होण्याची इच्छा पूर्ण करण्याच्या सर्व शक्यता या हुंड्याच्या प्रथेत अस्तित्वात आहेत.

## (३) धार्मिक पुस्तकाची उणीव

त्या सूफी संतांच्या काळात या देशात एक तर उलेमा (इस्लाम धर्मविषयक विद्वान) कमी होते. जे होते त्यांना सरकारी सेवेतून फुरसत कमी मिळत असे. त्यातही जे विद्वान लेखक होते ते लेखनासाठी अरबी किंवा फारसी भाषेचा उपयोग करीत. सामान्य लोकांच्या भाषेत लिहिणे त्या काळी कमीपणाचे समजले जात असे. शिवाय शासक अरबी किंवा फारसी जाणणारे असल्यामुळे देशी भाषेत लिहिण्याचा प्रश्न उद्भवत नसे. याच कारणास्तव अगदी जुन्या उर्दूतील काही पुस्तके जर आज हाती लागलीच, तर ती सूफी संतानी लिहिलेली असतात, ती इस्लामी विद्वानांनी लिहिलेली नाहीत.

त्यामुळे अध्ययन करून जे लोक विशुद्ध इस्लाम समजून घेऊ इच्छित होते तेही वंचित राहिले आणि इतर समजू लागले की, ज्याप्रमाणे साधू-संताची प्रवचने ऐकून हिंदू धर्म समजून घेतला जातो, तसेच सूफी संतांचा उपदेश आणि प्रवचने ऐकून इस्लाम धर्म समजून घेण्याचा एकच मार्ग आहे. म्हणून त्यांनी एकाच मार्गाचा अवलंब केला. परिणामत: इस्लामच्या विशुद्ध, खऱ्या, व्यापक, विस्तृत आणि पूर्ण ज्ञानापासून ते वंचित राहिले आणि सुधारणेची एक संधी हातातून निसटली.

## (४) हिंदू समाजाचा प्रभाव

खरबुजाला पाहून टरबुजा रंग बदलतो असे म्हटले जाते. सरडा आपल्या आजूबाजूला पाहून हेही विसरून जातो की, आपला स्वत:चा म्हणून एखादा रंग आहे की नाही. भारतातील मुस्लिम समाजाची काहीशी अशीच परिस्थिती झालेली आहे. या देशात हिंदू मुस्लिम मिश्र वस्तीत राहतात. अशा वस्तीतील एखाद्या गैरमुस्लिमाने आपल्या पुत्राचे लग्न करून हुंड्यात

मिळालेल्या सोन्याचांदीने आणि सामानसुमानाने आपले घर भरल्याचे जेव्हा एखादा मुस्लिम पाहतो, तेव्हा त्याच्याही तोंडाला पाणी सुटते. अशाच ऐषआरामाच्या सामानाने आपलेही घर भरावे, असे त्या मुस्लिमाला वाटते. परंतु त्याच्या आर्थिक दुर्बलतेमुळे तो असे सामान खरेदी करू शकत नाही. म्हणून अशा सामानसुमानाने आपले घर भरण्यासाठी आपल्याही पुत्राच्या लग्नात हुंडा तो मुस्लिम जाऊ लागतो. असे करत असताना इस्लामनुसार योग्य काय, अयोग्य काय, शास्त्रसंमत काय, निषिद्ध काय, हे त्या मुस्लिमाला एकतर माहीत नसते किंवा माहीत असले तरी तो त्यांची पर्वा करत नाही. कारण तो स्वार्थांध झालेला असतो. दोन्ही समाजांतील सामाजिक तत्त्वज्ञान आणि मूलभूत दृष्टिकोनातील तफावतीचा विवेक त्याला राहत नाही. धनाच्या अभिलाषेच्या जाळ्यात अडकल्यामुळे ही तफावत लक्षात घेण्याच्या अवस्थेतही तो राहत नाही. त्यामुळे हुंडा घेण्याचे हे कार्य तो बिनधास्तपणे उरकून घेतो. मात्र हुंडा घेण्याच्या त्याच्या पद्धतीचा (प्रथेचा) इस्लाम धर्माशी आणि श्रद्धेशी काडीमात्र संबंध नाही, उलट ते इस्लाम धर्माविरुद्ध आहे हे तो स्वार्थांध मुस्लिम लक्षात घेत नाही आणि इस्लामच्या तत्त्वज्ञानानुसार तो मोठा गुन्हा करून बसतो.

## (५) सभ्यता आणि प्रतिष्ठेच्या मूळ कसोट्यांतील लक्षणीय बदल

इस्लामने सदाचार, संयम, इंद्रियनिग्रह आणि ईशभीरूता या सभ्यता आणि प्रतिष्ठेच्या कसोट्या ठरविल्या आहेत. या कसोट्यांनुसार जी व्यक्ती जितकी सदाचारी, संयमी, इंद्रियनिग्रही आणि ईशभीरू असेल, तितकी ती व्यक्ती प्रतिष्ठित समजली जाते. परंतु काळाने या कसोट्यांना गुंडाळून ठेवून धनप्राप्तीस प्रतिष्ठेची कसोटी ठरविली आहे. प्रत्येक व्यक्तीला आपण समाजात प्रतिष्ठित असावे अशी तीव्र इच्छा असणे स्वाभाविक आहे. धनसंपत्तीला प्रतिष्ठेच्या कसोटीचा दर्जा प्राप्त झाल्यामुळे प्रत्येक व्यक्ती कोणत्याही मार्गाने लवकरात लवकर श्रीमंत होण्याची इच्छा बाळगू लागली. परिणामत: तत्काळ धन प्राप्त करण्याच्या धुंदीत उचित, अनुचित म्हणजेच इस्लामनुसार शास्त्रसंमत आणि निषिद्ध असलेल्या मार्गांच्या मर्यादेतून मुस्लिम समाज मुक्त होत गेला आणि झटपट श्रीमंत होण्याच्या अभिलाषेने हुंड्यासारख्या अनिष्ट प्रथेला तो कवटाळून बसला. आजच्या परिस्थितीत, मशिदी, मदरसे (इस्लामी पाठशाळा), 'दारूल उलूम' (इस्लामी विद्यापीठ) यांचे पदाधिकारी आणि जबाबदार व्यक्ती त्यांच्या संस्थेसाठी देणग्या मिळविताना देणगीदार केवळ श्रीमंत आहे की नाही एवढेच पाहतात. देणगीदारांचा उत्पन्नाचा मार्ग वैध आहे की निषिद्ध आहे याची त्यांना पर्वा नसते. (वास्तविक मशिदी, मदरसे आणि 'दारूल उलूम' यांना निषिद्ध उत्पन्नातून देणगी घेणे इस्लामनुसार निषिद्ध आहे.) परिणामत: या पदाधिकाऱ्यांचे व्यवहार अनुचित मार्गाने श्रीमंत होण्यास प्रेरक ठरत गेले आणि उचित मार्गाने मिळविलेल्या उत्पन्नाचे महत्त्व कमी होत चालले आहे.

हुंड्याच्या या अनिष्ट प्रथेचा मुस्लिम समाजात शिरकाव होण्यास आणखी एक कारण आहे. भारतातील मुस्लिम राजकर्त्यांच्या कालावधीत मुस्लिम बादशहा, नबाब, राजेरजवाडे आणि श्रीमंत मुस्लिमांनी चैन, विलास, विषयवासनातृप्तीसाठी आपल्या रंगमहालात, ज्यांच्याशी विवाह झाले नाहीत म्हणजे ज्या रीतसर पत्नी नाहीत अशा स्त्रियांना बाळगून असत. अशा स्त्रियांना झालेल्या अपत्यांना (मुलामुलींना) मुस्लिम समाज अनौरस संतती समजत असत. म्हणून अशा अपत्यांतील-विशेषकरून मुलींशी कोणीही मुस्लिम विवाह करण्यास तयार होत नसत. त्या काळात विवाहाची पहिली अट वधू शुद्ध रक्ताची म्हणजे कुलीन आणि खानदानी असणे आवश्यक होते. वधू उच्चकुलीन असल्याची खात्री प्रथम पटल्यानंतरच तिची दुसरी वैशिष्ट्ये पाहिली जात. समाजाच्या या प्रवृत्तीमुळे अनैतिक संबंधातून जन्मलेल्या मुलींच्या पित्यासमोर मोठे संकट उभे राहत असे. अशा परिस्थितीत अशा वधूपित्यासाठी एकच मार्ग उरला होता आणि तो म्हणजे गरीब घरच्या मुस्लिम मुलांना धनाची लालूच देऊन त्यांच्याशी अशा मुलींची लग्न करण्यास तयार केले जाई. या मार्गाने अनौरस मुलींची लग्ने होऊ लागली आणि त्यांच्या मातापित्यांची कठीण संकटातून सुटका होऊ लागली. तथापि मुस्लिम समाजात हुंड्याच्या प्रथेचा शिरकाव होण्यास मदत झाली. परिणामी औरस मुलींच्या विवाहातसुद्धा वरांना हुंडा देण्यास त्यांच्या मातापित्यांना भाग पाडल्यास याच घटना हळूहळू कारणीभूत होत गेल्या.

अशा तऱ्हेने हुंड्याच्या अनिष्ट आणि गैरइस्लामी प्रथेचा मुस्लिम समाजात शिरकावही झाला आणि या प्रथेची लोकप्रियतासुद्धा वाढली. आता तर या प्रथेने खेकड्यासारखे मुस्लिम समाजाला जखडून टाकले आहे. त्यास उखडून फेकणे कठीण नसले तरी सोपेही नाही.

प्रकरण ७

# हुंड्याच्या प्रथेस इस्लामी न्यायशास्त्रात म्हणजे शरीयतमध्ये स्थान आहे काय?

हुंड्याच्या प्रथेस शरीयत (इस्लामी न्यायशास्त्र) मध्ये स्थान आहे काय, हे पाहण्यासाठी काही इस्लामी मूलभूत सिद्धान्त बारकाईने अभ्यासणे आवश्यक आहे. इस्लामने निश्चित केलेल्या समाजव्यवस्थेचा पाया कठोर न्यायावर आधारित केलेला असतो, ही बाब प्रथम लक्षात ठेवली पाहिजे. इस्लाम समाजातील कोणत्याही व्यक्तीवर अन्याय सहन करत नाही आणि कोणाच्याही हक्कावर गदा आणण्याची अनुमती देत नाही.

## (१) नैतिकता आणि सामाजिक परंपरा

समाजातील कुटुंबसंस्थेची घडण करत असतानासुद्धा इस्लामने उपरोक्त सिद्धान्त आचरणात आणला आहे. लग्नात दोन पक्ष असतात, एक वधूपक्ष आणि दुसरा वरपक्ष विवाहामुळे एका व्यक्तीची आपल्या कुटुंबात वाढ होत असून एक तरूण मुलगी आपल्या पुत्राच्या जीवनात त्याची जीवनसाथी म्हणून येत आहे, याचा वरपित्याला आनंद होत असतो. त्याच वेळी आपली प्रिय मुलगी दुरावण्याच्या भावनेची दु:खी छाया वधूकुटुंबावर पडलेली असते. कारण मुलीच्या विवाहानंतर तिच्या कुटुंबातून एक व्यक्ती कमी होत असते. वर्षानुवर्षे परिश्रमपूर्वक पालनपोषण केलेली मुलगी दुसऱ्या कुटुंबाची घटक बनत असते. असे असतानासुद्धा आपल्या कुटुंबात आपल्या मुलीचा कायम सांभाळही वधूपित्याला करता येत नाही, हीसुद्धा त्याची विवशता असते. त्यामुळे वधूपिता द्विधा आणि दु:खी मन:स्थितीत असतो.

विवाह जुळविण्याच्या प्राथमिक अवस्थेपासूनच मुस्लिम समाजात जे रीतिरिवाज सुरु होतात, त्यात वधूपित्याच्या द्विधा मन:स्थितीचा पूर्ण विचार करण्यात येतो, जेणेकरून वधूच्या कुटुंबीयांची आपल्या मुलीच्या विरहाच्या दु:खी भावनेची तीव्रता कमी व्हावी. वरपक्षाकडून वधूपक्षाकडे विवाहासंबंधी जो प्रस्ताव पाठविला जातो, तो पाहणे याबाबतीत उद्‌बोधक ठरेल. तुम्ही आपली मुलगी आम्हाला द्यावी किंवा आपल्या मुलीचे आमच्या मुलाशी लग्न करून आपल्या मुलीला आमच्या घरी पाठवावे असा रूक्ष आणि दु:खदायक संदेश न पाठविण्याची दक्षता घेतली जाते. घटना वास्तविक या संदेशात दर्शविल्याप्रमाणेच घडत असल्या तरी, अंतिमत: संदेशाची भाषा पाहण्यासारखी आहे. या संदेशात म्हटले जाते की, आमच्या अमुक अमुक चिरंजीवास आपला जावईपुत्र म्हणून स्वीकृत केल्यास आनंद होईल. या संदेशास स्वीकृती मिळाल्यास वरपिता, वधूपित्यावर उपकार केल्याचेसुद्धा बोलून दाखवत नाही. उलट वरपिता वधूपित्याचे उपकार आणि आभार मानतो. वधूपित्याच्या भावनेची किती कदर केली जाते हे यावरून दिसून येते. दुसरे असे की, लग्नविधीकरिता वधूपिता वधूला घेऊन वरपित्याच्या घरी कधीही जात नाही, तर नेहमी वरपिता, वरातीने वधू पित्याच्या घरी जातो, जेणेकरून वधूपित्यास कमीपणाची जाणीव होऊ नये. उलट त्यास असे वाटावे की, आपली मुलगी आपल्या होणाऱ्या व्याह्याच्या घरची अतिमहत्त्वाची आवश्यकता आहे. याप्रमाणे संपूर्ण विवाह सोहळ्यातील प्रत्येक विधीमध्ये वधूपिता आणि त्याच्या

संपूर्ण घराण्यातील लोकांच्या मनात कसलीही कमीपणाची किंवा मुलीच्या विरहाची यत्किंचित भावनाही उत्पन्न होऊ नये असा कसोशीने प्रयत्न केला जातो. साधा भावनात्मक अन्यायसुद्धा होऊ न देण्याच्या या परंपरांचा उगम शरीयतच्या उपरोल्लेखित सिद्धान्तामध्ये आहे, जेथे मानवी भावनांनासुद्धा इतके जपण्याची व्यवस्था आहे, तेथे वधूपित्याकडून जबरदस्त हुंडा उकळून, त्यास देशोधडीला लावणाऱ्या हुंड्याच्या प्रथेस शरीयतमध्ये कसलेही स्थान असणे शक्य नाही.

## (२) हुंड्याचा (जहेजचा) पहिला प्रकार

आपल्या वात्सल्यामुळे तिच्या विवाहप्रसंगी संसारोपयोगी साहित्य तिला भेट म्हणून देण्याचा प्रयत्न वधूचे मातापिता करतात. (तथापि असे साहित्य देण्याससुद्धा इस्लामी धर्मशास्त्रात, शरीयतमध्ये किंवा इस्लामी इतिहासात उल्लेख आढळत नाही, हे मागील प्रकरणात पाहिले आहे.) वधूमातापित्याच्या ऐच्छिक भेटीच्या स्वरुपात हे साहित्य दिले जाते. या साहित्याची मागणीही वरपक्षाकडून केली जात नाही किंवा विवाहाच्या अटीमध्येही पूर्वीपासून ते निश्चित केलेले नसते. वधूपित्याची खुशी, इच्छा आणि त्यांच्या आर्थिक कुव्वतीनुसार हे संसारोपयोगी साहित्य दिले जाते. संसारोपयोगी साहित्य देण्याच्या या प्रकाराला 'जहेज' म्हटले जाते. हा प्रकार इस्लामी धर्मशास्त्रानुसार आहे हे सिद्ध करण्यासाठी ''जहेज फातमी''ची सनद (पुरावा) पुढे केली जाते. तथापि हे कसे चूकीचे आहे याची सविस्तर चर्चा मागील प्रकरणात करण्यात आली आहे. संसारोपयोगी साहित्य वधूला भेट स्वरूपात देणे हा ''जहेज''चा पहिला प्रकार आहे. या प्रकारालासुद्धा इस्लामी धर्मशास्त्राचा आणि परंपरेचाही आधार नाही. तथापि यात मध्यममार्गाच्या मर्यादाभंग केला जात नसेल, अतिशयोक्ती केली जात नसेल आणि वरपक्षाकडून जबरदस्तीने मागणी केली जात नसेल, तर त्यास अयोग्य म्हटले जाऊ शकत नाही.

## (३) हुंड्याचा (जहेजचा) दुसरा प्रकार

वास्तविक दुसऱ्या प्रकारचा ''जहेज'' म्हणजे हुंड्याची बाब हा चर्चेचा विषय आहे आणि याबाबतीत मागील प्रकरणात उहापोह करण्यात आला आहे. त्यामध्ये त्याचा उगम, वैशिष्ट्ये, कारणे आणि परिणाम याविषयी माहिती घेण्यात आली आहे. या प्रकारात असंख्य अवगुण आणि धोके आहेत. 'जहेज'च्या पहिल्या प्रकारास इस्लाम धर्मशास्त्राची किंवा परंपरेची मान्यता नसल्यामुळे 'जहेज'चा दुसरा प्रकार म्हणजे 'हुंड्याची प्रथा' कोणत्याही प्रकारे मुस्लिम समाजासाठी अनुकूल नाही.

## (४) हुंड्याची प्रथा : माणुसकीचा अपमान

हुंड्याच्या प्रथेत माणुसकीचा लांच्छनास्पद अपमान आहे. मुलगा आणि मुलगी हे दोन्ही माणूस असून ईशनिर्मित सृष्टीतील सर्व गोष्टींपेक्षा सर्वश्रेष्ठ असलेल्या मानवांपैकीच दोघेही आहेत. परंतु कोणत्याही मुलीला स्वीकारण्यासाठी विवाहाच्या करारामध्ये ठराविक रक्कम घेण्याचे निश्चित करणे म्हणजे वरपक्षावर मुलींपेक्षा पैसा महत्त्वाचा आहे आणि त्याशिवाय मुलीला स्वीकारता येऊ शकत नाही याची ती खूणगाठ आहे. लालुच म्हणून मुलगी आपल्या पाठीवर धनदौलत घेऊन आल्याशिवाय तिला कोणताही पुरुष स्वीकारत नाही, असे घडत असेल तर

मुलगी एक भयानक आपत्ती आणि संकट आहे, या जाणिवेस समर्थन प्राप्त होते. ही जाणीव संपूर्ण समाजासाठी घातक आहे.

## (५) मुलीला तुच्छ समजणे

मुलीला तुच्छ समजण्याची ही प्रथा संपूर्ण मानवजातीला अपमानकारक असून ती प्रथा अमानवी नीतीवर आधारित आहे. अल्लाहने पवित्र कुरआनात सांगितले आहे की, स्त्रीसुद्धा मानवापैकीच आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अनेक हदीसद्धारे सांगितले आहे की, मुलगा आणि मुलगी यामध्ये भेदभाव करून मुलीला तुच्छ समजणे आणि तिला अप्रिय मानणे अतिशय लज्जास्पद असून ते इस्लामी तत्त्वज्ञानाविरुद्ध आहे. या प्रथेमुळे मुलगा आणि मुलगी यामध्ये भेदभाव तर होतोच, शिवाय त्यामुळे मुलीचे जन्मणे स्वत: मातापित्यांना जीवन जगणे असह्य भासू लागले. मुलीच्या जन्मापासूनच आई-वडील चिंताग्रस्त होतात आणि त्यांच्यासमोर संकट उभे राहते. येणारा जावई कसा असेल? अल्लाह जाणे हुंड्यावर किती पैसा खर्च करावा लागेल? याची काळजी त्यांना सतावू लागते. नंतर स्वत: मुलगी जसजशी तारूण्यात पदार्पण करू लागते, तेव्हा तिला आपल्या तथाकथित कमीपणाची जाणीव होते आणि त्यामुळे तिच्या मानसिकतेवर खूप वाईट परिणाम होतात. त्यामुळे मुलीच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास जसा व्हायला हवा तसा होऊ शकत नाही.

## (६) अनुचित अत्याचार

हुंड्याची प्रथा उघडउघड अन्यायावर आधारित आहे. ईश्वराने एखाद्यास मुलीचा पिता बनविले, केवळ यामुळे त्याने आपली वैध कमाई एखाद्याला उचलून देण्यास त्याला विवश करणे हा पराकाष्ठेचा अन्याय आहे. मुलीच्या जन्मापासून तिने तारूण्यात पदार्पण करीपर्यंत तिचा पिता, तिचे पालनपोषण करणे, संगोपन करणे, शिक्षण देणे, तिला संस्कारक्षम बनविणे यासाठी तो कमी श्रम करीत नाही आणि यासाठी त्याला खर्चही कमी येत नाही. एवढे करूनसुद्धा, जेव्हा तो आपल्या मुलीच्या लग्नासाठी उभा राहतो, तेव्हा त्यांनी तिच्यासाठी केलेल्या परिश्रमासही कोणी महत्त्व देत नाही आणि त्यांनी केलेल्या खर्चाचीसुद्धा कोणी पर्वा करत नाही. उलट त्याच्या सर्व परिश्रमाकडे दुर्लक्ष करून एवढी रक्कम हुंडा म्हणून दिली तरच त्याच्या मुलीशी लग्न करणे शक्य आहे, अशी निर्वाणीची भाषा केली जाते. मुलीच्या बापास तर आपल्या मुलीचे लग्न करण्याशिवाय दुसरा पर्याय नसतो, म्हणून तो वरपक्षाकडून केलेल्या मागण्यांची पूर्तता करण्यास विवश होतो आणि आपल्या ज्या कमाईवर आपल्या इतरही अपत्यांचा हक्क असतानासुद्धा ती कमाई, होणाऱ्या भावी जावयाच्या हवाली करतो, हा उघडउघड अन्याय, अत्याचार आणि बळजबरी आहे. मुलगा अथवा मुलीचा जन्म ईशइच्छेवर अवलंबून आहे तरी मुलगी जन्मल्यास मुलीच्या बापाला ही शिक्षा भोगावी लागते. हुंड्याच्या नावावर वसूल केली जाणारी रक्कम, अवैध पद्धतीने एकदुसऱ्याची संपत्ती हडप करण्याच्या वृत्तीची निदर्शक आहे. पवित्र कुरआनने स्पष्ट आदेश दिला आहे,

" हे श्रद्धावंतांनो! आपसात एकमेकांची संपत्ती खोट्या पद्धतीने खाऊ नका. व्यवहार झाला पाहिजे परस्परांच्या राजीखुषीने आणि स्वत:चा आत्मघात करू नका. खात्री बाळगा की अल्लाह तुम्हावर मेहरबान आहे, जो कोणी जुलूम व अत्याचाराने

असे करील त्याला नि:संशय आम्ही आगीत लोटू आणि हे अल्लाहकरिता काही अवघड कार्य नाही." *(दिव्य कुरआन, ४: २९-३०)*

पवित्र कुरआनातील उपरोक्त आयतीद्वारे, दुसऱ्याची संपत्ती अवैध मार्गाने गिळंकृत करण्यास, अन्याय जुलूम आणि बळजबरी ठरविले आहे आणि असे करणाऱ्या लोकांना अल्लाह नरकात फेकील अशी समज दिली आहे. अशा परिस्थितीत हुंडा मागण्याची प्रथा अमलात आणणाऱ्या लोकांनी त्या दुष्कृत्याच्या दुष्परिणामाची भीती बाळगलीच पाहिजे.

पवित्र कुरआनच्या उपरोल्लेखित आयतीन्वये जी भूमिका स्वीकारली आहे आणि ज्या शब्दांत नरकाग्नीच्या शिक्षेची धमकी दिली आहे, त्यामुळे ज्याच्या मनात थोडीशीही श्रद्धा बाकी उरलेली असेल आणि अंतिम निर्णयदिन निश्चित येण्यावर आणि स्वर्ग व नरक या कपोलकल्पित कथा नसून वास्तव आहेत यावर श्रद्धा असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला कापरे भरेल आणि हुंड्यासारख्या अनिष्ट प्रथेपासून ती व्यक्ती परावृत्त होईल.

## (७) स्त्रीविषयक असंस्कृत विचार रोखणे

मुस्लिम समाजात हुंड्याच्या प्रथेचा शिरकाव झाल्यामुळे, हिंदू समाजात त्यांच्या धार्मिक शिकवणुकीच्या परिणामी निर्माण झालेला स्त्रीविषयक असंस्कृत आणि तिरकृत विचार, मुस्लिम समाजातही निर्माण होण्याचा धोका वाढला आहे. त्यामुळे मुस्लिम समाजात गैरइस्लामी परिस्थिती आणि प्रवृत्ती निर्माण होऊ लागून मुस्लिमांचासुद्धा स्त्रीविषयक दृष्टिकोन बदलू लागला आहे. स्त्रीला जीवनसाथी मानण्याऐवजी ती केवळ शारीरिक सुखाची वस्तू मानली जाऊ लागली आहे. या प्रवृत्तीला अगदी वेळेवर रोखण्यासाठी हुंड्याच्या प्रथेचे मुस्लिम समाजातून समूळ उच्चाटन करणे आवश्यक आहे. तसे न झाल्यास इस्लामचे सर्व तत्त्वज्ञान गुंडाळून ठेवून विवाहित स्त्रियांना हुंड्यासाठी जाळून टाकण्याच्या घटना मुस्लिम समाजातसुद्धा सर्रास घडू लागतील आणि त्यांना आत्महत्येचे रूप दिले जाईल. अशा तऱ्हेच्या घटना या देशातील मुस्लिमेतर समाजात मोठ्या प्रमाणात घडत असतानासुद्धा इस्लामच्या जबरदस्त तत्त्वज्ञानामुळे मुस्लिम समाजात अशा तऱ्हेच्या घटना अद्याप घडत नाहीत. तथापि स्त्रीविषयक अनिष्ट विचारांची सुरवात मुस्लिम समाजात होऊ लागल्याचे दिसते. एखाद्याच्या घरी मुलगी जन्मली तर तिच्या मातापिता आणि नातेवाईकांत आनंदाची चिन्हे अजिबात दिसत नाहीत. या मर्यादेपर्यंत या बाबीची सुरवात मुस्लिम समाजातही होऊ लागली आहे. या सुरवातीपासूनच मागून येणाऱ्या परिणामांची काळजी घेणे आवश्यक आहे. मुस्लिम आपल्या पुत्राच्या लग्नाचा प्रस्ताव पाठविण्यापूर्वी मुलीच्या आईवडिलांच्या आर्थिक परिस्थितीची आणि 'जहेज'चे साहित्य देण्याच्या त्यांच्या ऐपतीची आधी चौकशी करू लागले आहेत. ज्या भागात हुंड्याच्या प्रथेने उग्र स्वरुप धारण केलेले नाही त्या भागातील ही परिस्थिती आहे. परंतु ज्या भागात या लांच्छनास्पद प्रथेने जोर धरला आहे तेथील मुली विवाहाच्या प्रतिक्षेत वयस्कर होऊ लागल्या आहेत. या परिस्थितीत ज्याप्रमाणे आपल्या देशातील हिंदू समाज हुंड्याच्या प्रथेने ग्रासला गेला आहे तशी परिस्थिती आपल्या मुस्लिम समाजात निर्माण होऊ नये, याची काळजी मुस्लिम समाजाने घेतलीच पाहिजे.

## (८) हुंडा घेणे हा तर दरोडेखोरीचाच एक प्रकार

हुंड्याची प्रथा उद्देशाच्या दृष्टीने दरोडेखोरीचीच जुळी बहीण आहे. दरोडेखोर जेव्हा एखाद्या घरात घुसतात, तेव्हा घरातील लोकांना भयभीत करून, त्यांनी वैध मार्गाने स्वत:च्या श्रमाने कमविलेली कमाई आपल्या हाताने दरोडेखोराच्या स्वाधीन करण्यास भाग पाडतात. अगदी तसेच वरपक्षसुद्धा वधूमातापित्याच्या घरी लग्नाचा प्रस्ताव घेऊन जाऊन प्रथम मुलीला पसंद करतात आणि नंतर मागण्या करायला सुरवात करतात. मुलीसाठी एखादा लग्नाचा प्रस्ताव यावा आणि लग्न ठरू नये, ही बाब मुलीसाठी लज्जास्पद समजली जाते. मुलीचे लग्न न ठरता, आलेल्या पाहुण्यांना परत जावे लागणे ही बाब आपल्या समाजात, मुलीची आणि तिच्या आईबापाची बदनामी समजली जाते. अशा बदनामीच्या भीतीने मुलीचे आईवडील लाचार होऊन वाटेल तेवढा खर्च करण्याची तयारी दाखवून लग्न ठरवितात. त्या वेळी आपल्या आर्थिक कुव्वतीचे त्याना भानही राहत नाही. म्हणून ते कर्जबाजारी होतात. काहींच्या बाबतीत राहते घर गहाण ठेवून किंवा विकून लग्नासाठी रक्कम जमा केली जाते आणि राहत्या घराला मुकावे लागते. शिवाय वर्षानुवर्षे त्यांना कर्ज फेडत राहावे लागते. आयुष्यात पुन्हा स्वत:चे घर घेण्याची त्यांची ऐपतही राहत नाही. निदान दरोडेखोर घरातील केवळ संपत्तिच लूटून नेतात, तर वरपक्ष, वधूमातापित्याची कमाई लुटतातच, शिवाय त्यांचे राहते घरही शिल्लक ठेवत नाहीत. वेळप्रसंगी त्यांना कर्जबाजारीही करून सोडतात. दरोडेखोरांपेक्षा कितीतरी अधिक भयानक परिस्थिती वरपक्ष निर्माण करतात. एवढे करूनसुद्धा अधिक लोभामुळे लग्नानंतरसुद्धा अनेक मागण्या वरपक्षाकडून केल्या जातात. या मागण्या पूर्ण करता न आल्यास विवाहितेला जाळून मारण्याची भीती मुलीच्या आईवडिलांना सतत छळत असते.

## (९) स्त्री-पुरुष अनैतिक संबंधांचा उद्भव

हुंड्याच्या या अनिष्ट प्रथेमुळे, जास्तीतजास्त हुंडा मिळविण्याच्या उद्देशाने, मुलाचे आईवडील आपला मुलगा तारूण्यात आला तरी शिक्षण पूर्ण होण्याचे निमित्त पुढे करून त्याचे लग्न पुढे ढकलतात, नंतर नोकरीची सबब पुढे करतात, तद्नंतर मुलगा आणि सुनेसाठी घर घेण्याचे निमित्त पुढे करतात. या सर्व सबबींमागे छुपा उद्देश, हुंड्याच्या बाजारात पुत्राची किंमत वाढावी हा असतो. परिणामी मुलाचे वय बरेच वाढते. दुसरीकडे चांगल्या स्थळांच्या प्रतीक्षेत मुलीही आपले बरेच वय होईपर्यंत अविवाहित राहतात. अशा परिस्थितीत तारूण्य सुलभ प्रणयोन्माद, प्रेमाकर्षणाच्या आवेगाची नशा, तारूण्यातील नैसर्गिक लैंगिक निकड इ. बाबींमुळे विवाहास दिरंगाई झालेल्या तरूण-तरूणींना नैतिक बंधनात स्वत:स रोखून धरणे अतिशय कठीण होते. शिवाय शृंगारिक कादंबऱ्या, भावना उद्दीपित करणारे उत्तान आणि अश्लील चित्रपट, मासिके, पुस्तके, लैंगिक शिक्षणाचा अभाव इ. मुळे बिघडलेली परिस्थिती, विवाहास दिरंगाई झालेल्या तरूण-तरूणींना अनैतिक संबंध निर्माण करण्यास प्रेरक ठरतात. ही परिस्थिती मुस्लिम तरूण-तरूणीना आपले चारित्र्य निष्कलंक ठेवण्यास आव्हानात्मक ठरते. हे केवळ उघड संकटच नसून संपूर्ण मुस्लिम समाजाचे चारित्र्य भंग करणारे साधनही आहे. परंतु इस्लाम आपल्या समाजास, कोणत्याही परिस्थितीत तरूण-तरूणींच्या अनैतिक संबंधापासून स्वच्छ ठेवू इच्छितो. म्हणून अशा गुन्ह्यात शंभर कोडे मारण्याची शिक्षा निश्चित करतो. उपरोक्त विवेचन केलेल्या

परिस्थितीत एखाद्या तरूण तरूणीने विवश होऊन अनैतिक संबंधाचा गुन्हा केला, तर त्याची पूर्ण जबाबदारी समाजाची असेल. कारण समाजातील हुंड्याच्या घृणास्पद प्रथेमुळे मुस्लिम तरूण-तरूणींच्या निष्कलंक चारित्र्यास धोका निर्माण झालेला असतो.

## (१०) हुंड्याची प्रथा विवाहातील मोठे विघ्न

इस्लामच्या दृष्टिकोनात विवाहास किती महत्त्व प्राप्त आहे हे पवित्र कुरआन आणि हदीस यांचा हवाला देऊन मागील प्रकरणामध्ये स्पष्ट करण्यात आले आहे. इस्लाम आपल्या समाजात पुरुष आणि स्त्री यांच्यामधील संबंध दृढ करण्यासाठी विवाहाशिवाय दुसऱ्या कोणत्याही प्रकाराला कोणत्याही परिस्थितीत सहन करत नाही. स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनी, तरूणांना विवाह करण्यास प्रोत्साहन दिले आहे. प्राचीन ग्रीक संस्कृतीत, स्त्रियांच्या योनीसंरक्षणासाठी चॅस्टिटी बेल्ट (Chastity Belt)(योनीमार्ग झाकणारी धातूची पट्टी) घालणे स्त्रियांना सक्तीचे होते. इस्लामने विवाहास दृष्टी, लिंग आणि योनी यांचे रक्षक ठरविले आहे. शिवाय पैगंबर मुहम्मद (स.) यांनी विवाहास "ही माझी परंपरा आहे' असा आदेशवजा इशारा दिला आहे. (पैगंबर मुहम्मद (स.) यांची प्रत्येक परंपरा अमलात आणणे प्रत्येक मुस्लिमास बंधनकारक आहे.)

परंपरेच्या बाबतीत आदेश आहे,

"जो माझ्या परंपरेची उपेक्षा करील त्याचा माझ्याशी कसलाही संबंध नाही."

(हदीस : बुखारी, मुस्लिम)

विवाहाची उपेक्षा करणाऱ्यांचा आणि ज्या विवाहास 'माझी परंपरा' असे स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) म्हणतात, त्या विवाहात विघ्ने (हुंडा मागणीद्वारे वगैरे) निर्माण करणाऱ्यांचा आपली परंपरा अमलात आणण्याच्या मार्गात अडचणी निर्माण करणाऱ्यांचा आपल्याशी कसलाही संबंध नसल्याचा आदेशवजा इशारा खुद्द पैगंबर मुहम्मद (स.) यांनी दिला आहे. विवाहाची उपेक्षा करणारी एखादी व्यक्ती असो किंवा व्यक्तींच्या समूहाच्या स्वरुपात एखादा समाज असो, त्यांना हा आदेश लागू होतो. पैगंबर मुहम्मद (स.) यांची परंपरा अमलात आणण्यास हुंड्याची प्रथा सर्वांत मोठी अडचण निर्माण करते. वरपिता अधिकाअधिक हुंडा वसूल करण्याच्या आभिषेने आपल्या मुलाचे लग्न पुढे ढकलत नेतो आणि त्याच वेळी वधूपिता धनाच्या कमतरतेमुळे सुयोग्य वर न मिळाल्याने आपल्या मुलीचा विवाह लांबणीवर टाकत जातो. त्यामुळे काही पुरुषांना आणि स्त्रियांना आयुष्यभर अविवाहित राहावे लागते. याप्रमाणे पैगंबर मुहम्मद (स.) यांची परंपरा अमलात आणण्याच्या मार्गात हुंड्याची प्रथा सर्वांत मोठी अडचण ठरते. म्हणून ही प्रथा निश्चितच महापाप आहे यात शंका नाही.

## (११) हुंड्यामुळे स्वार्थी समाजाची निर्मिती

स्वार्थी समाजाची निर्मिती ही हुंड्याच्या प्रथेची परिणती आहे. हुंडा घेऊन जेव्हा मुलाचे लग्न करावयाचे असते, तेव्हा जास्तीतजास्त हुंडा उकळण्याच्या दृष्टीने मोठमोठे संकल्प सोडले जातात, षडयंत्रे रचली जातात. मुलाचे शिक्षण, त्याच्या नोकरीतील हुद्दा, नोकरीतील वेतन, नोकरीतील वरकमाई किंवा धंद्यातील उत्पन्न याविषयी चक्क खोटी आणि अतिशयोक्तीपूर्ण माहिती पसरविली जाते आणि वधूपित्याला ही माहिती पुरविली जाते. वरपित्याने मागितलेली

हुंड्याची मागणी वधूपित्याच्या आर्थिक कुव्वतीपेक्षा खूप मोठी असते. परंतु जेव्हा याच वरपित्याच्या मुलीचे लग्न करावयाचे असेत, तेव्हा अल्लाह आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या नावाची आणि त्यांच्या आदेशांची मदत घेऊन वरपित्यास दोषी ठरविले जाते. त्याला बदनाम केले जाते. म्हणजे हुंड्याच्या रूपाने फुकटात मालमत्ता मिळण्याची वेळ येते, तेव्हा अल्लाह आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आदेशांची पर्वा केली जात नाही. परंतु हुंडा देण्याची वेळ आली की, अल्लाह आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आदेशांची आठवण करून दिली जाते.

## (१२) ही तर बांडगुळी वृत्ती

इस्लाम आपल्या समाजातील स्त्रियांना आर्थिक जबाबदारीतून मुक्त ठेवतो. पत्नीची सर्व आर्थिक जबाबदारी पतीवर असते. काही वनस्पती आणि प्राणी दुसऱ्याच्या श्रमावर जगतात त्यांना बांडगूळ म्हणतात. या बांडगुळाप्रमाणे हुंडा घेणारे लोक भावी पत्नीची कमाईच काय तिच्या बापाच्या श्रमाच्या कमाईवर दरोडा घालण्यास मागे पुढे पाहत नाहीत. या कमाईवर त्यांचा कायदेशीर, नैतिक, धार्मिकदृष्ट्या कोणताही अधिकार नसतो. एखादी मुलगी विवाहापूर्वी नोकरी करीत असेल किंवा एखाद्या धंद्यात तिने भांडवल गुंतवले असेल आणि तिला त्यापासून काही उत्पन्न मिळत असेल किंवा तिला बापाकडून वारसाहक्काने काही मिळत असेल, तर तिच्या विवाहानंतर तिच्या पतीचा या उत्पन्नावर कायदेशीर, नैतिक किंवा धार्मिकदृष्ट्या कोणताही अधिकार नसतो. या सर्व कमाईवर पूर्णपणे हक्क त्या पत्नीचा असतो. कारण ते स्त्रीधन असते. हुंडा घेणारा पती ही कमाई आपल्या ताब्यात घेतो. जे लोक हुंड्याच्या या लज्जास्पद प्रथेत अडकलेले नसतात, तेसुद्धा पत्नीची कमाई हडप करण्यापासून अलिप्त राहत नाहीत. वास्तविक पत्नीची कमाई इस्लामने पतीला निषिद्ध ठरविली आहे. या उत्पन्नावर केवळ पत्नीचा हक्क असतो. मुस्लिम पतींनी आपल्या पत्नीच्या हक्काबाबत जागरूक राहिले पाहिजे. कारण या बाबतीत अंतिम निवाड्याच्या दिवशी विचारणा होईल, हे त्यांनी लक्षात ठेवले पाहिजे.

हे बांडगुळी वृत्तीचे लोक मुलीच्या बापाकडून अनेक प्रकारे वसुली करतात. संसारोपयोगी साहित्य देण्याचे कोणतेही बंधन इस्लाममध्ये नसताना आणि ते वधूपित्याच्या खुशीवर आणि इच्छेवर अवलंबून असताना अनेक मौल्यवान वस्तू 'जहेज'च्या नावावर वधूपित्याकडून जबरदस्तीने वसूल केल्या जातात. नवऱ्या मुलासाठी १४/१५ पोशाखाचे पैसे वधूपित्याकडून वसूल केले जातात. इतके सर्व करूनसुद्धा नवविवाहितेला घरकाम करणाऱ्या मोलकरणीसारखे वागविले जाते. तिच्या आवश्यक गरजासुद्धा पुरविल्या जात नाहीत. तिच्या गरोदरपणातसुद्धा तिला फळफळावळ, पौष्टिक सकस आहारसुद्धा मिळू देत नाहीत. कारण अशा वृत्तीचे लोक आपल्या मुलाचे लग्नसुद्धा व्यापारी वृत्तीने करत असतात. इस्लामविषयी मोठमोठ्या गोष्टी सांगणारे लोकसुद्धा असे करतात, तेव्हा त्यांची कीव कराविशी वाटते. कारण हे सर्व करताना त्यांनी इस्लामच्या तत्त्वांना हरताळ फासलेला असतो. या लोकांनी अंतिम निवाड्याच्या दिवसांची आठवण ठेवावी, हे त्यांच्यासाठी कल्याणप्रद होईल.

## (१३) निषिद्ध माल कमविण्याची प्रवृत्ती हुंड्याची प्रथा एक कारण

हुंड्याची प्रथा अमलात आणणारे लोक वधूपित्याकडून निषिद्ध माल वसूल करतात.

त्यामुळे मुलीचा बाप मुलीच्या जन्मापासून, हुंडा देता यावा म्हणून जास्तीतजास्त रक्कम जमविण्यासाठी चिंताग्रस्त असतो. मुलीला चांगले स्थळ मिळावे म्हणून जास्तीतजास्त धन त्याला प्राप्त करावयाचे असते. वैध मार्गाने इतकी कमाई होत नसल्यास मुलीचा पिता विवश होऊन अवैध मार्गाने म्हणजे गुन्हेगारी मार्गाने कमाई करण्याचा प्रयत्न करतो, अशा तऱ्हेने हुंडा वसूल करण्याच्या एका दुष्ट प्रवृतीमुळे समाजामध्ये असंख्य गुन्ह्याचे दरवाजे उघडले जातात. त्यामुळे मुस्लिमांच्या चारित्र्याची धूळधाण होऊन ते बरबाद होतात. याचा परिणाम संपूर्ण समाजावर होतो. निषिद्ध कमाई करण्याची प्रवृत्ती वाढीस लागते. हरामखोरीची एकदा सवय लागली की त्याचे व्यसनात रूपांतर होते आणि व्यसनातून मुक्त होणे ही सोपी गोष्ट नसते. त्यामुळे संपूर्ण समाज गुन्हेगारीच्या विळख्यात अडकतो. समाजातील घातक प्रथा समाजाचे स्वास्थ्य कसे बिघडवितात याचे हे उत्तम उदाहरण आहे.

## (१४) समाजात असमतोल निर्माण होणे

हुंड्याच्या प्रथेमुळे मुस्लिम समाजात असमतोल निर्माण होत आहे. किमान हुंडा द्यावा लागावा म्हणून लोक आपल्यापेक्षा कमी आर्थिक परिस्थितीच्या आणि कमी सामाजिक दर्जाच्या लोकांमध्ये आपल्या मुलीसाठी स्थळे शोधतात. पण आपल्या मुलासाठी मात्र आपल्यापेक्षा उच्च आर्थिक क्षमतेच्या आणि उच्च सामाजिक दर्जाच्या घराण्यातील मुली शोधल्या जातात. (यात अधिक हुंडा मिळविण्याची इच्छा असते) मात्र या दोन्ही प्रकारांमुळे विवाहित मुलींना त्रास सहन करावा लागतो. कमी आर्थिक आणि सामाजिक दर्जाच्या घराण्यात विवाहित होऊन गेलेल्या मुली हे विवाहित नातेसंबंध, कायद्याच्या दृष्टीने कबूल करून ते निभविण्याचा प्रयत्न करतात. तथापि दर्जातील तफावतीमुळे मानसिक तृप्ती आणि समाधानापासून त्या आयुष्यभर वंचित राहतात. आपल्या भावजयीच्या नशिबावर केवळ हेवाच नव्हे तर मत्सरही करू लागतात. कमी दर्जाच्या घराण्यातील पतीसुद्धा भावनाविवश आणि चिंताग्रस्त होतो आणि पत्नीपेक्षा अधिक न्यूनगंडास तो बळी पडतो. पती-पत्नीमध्ये वरवर संबंध चांगले भासत असले तरी आतून दुजाभाव असतो. अनेक कुटुंबांत अशा तऱ्हेची परिस्थिती निर्माण झाल्यामुळे संपूर्ण समाज असंतुष्टतेच्या आहारी जातो आणि संपूर्ण समाजाचे स्वास्थ्य बिघडते.

## (१५) हुंड्याच्या प्रथेचे चुकीचे समर्थन करणे पाप आहे

हुंडा उकळणारे मुस्लिम हुंड्याच्या प्रथेचे समर्थन चलाखीने करण्याचा प्रयत्न करतात. गैरमुस्लिमांकडून उसनवार घेतलेल्या या प्रथेसाठी इस्लामी धर्मानुकूल फतव्याची (मुफ्तींनी दिलेल्या निर्णयाची) सबबसुद्धा हे लोक पुढे करतात. त्यांच्या म्हणण्यानुसार, "ज्याअर्थी शरीयतने बापाच्या मालमत्तेच्या वारसाहक्कात मुलीचा हिस्सा निश्चित केला आहे. (जगात सर्वप्रथम पवित्र कुरआनाने बापाच्या मृत्यूनंतर वारसा हक्कानुसार त्यांच्या मुलीचा हिस्सा निश्चित केला आहे हे खरे आहे.) परंतु मुस्लिम मुलीच्या या वारसाहक्काकडे पूर्णपणे दुर्लक्ष केले जाते आणि वारसाहक्काने मिळालेल्या मालमत्तेची वाटणी फक्त पुत्रामध्ये केली जाते. मुलीला तिचा वाटा मिळत नाही. म्हणून हुंड्याच्या नावावर या मालमत्तेची (रकमेच्या स्वरुपात) वसूली करणे म्हणजे वस्तुत: बापाच्या मालमत्तेतून मुलीचा वारसाहक्क करण्याचा हुंडा मागणे हा एक मार्ग आहे," असे हे लोक अर्ध सत्य सांगतात. पवित्र कुरआननेच मुलीच्या हिस्याची तरतूद केली असल्याने

शरीयतमध्येसुद्धा तरतूद आहे, हे खरे. तथापि बाप जीवंत असताना त्याच्या मालमत्तेची वाटणी वारसदारांना करता येत नाही, ही बाब ते लपवून ठेवतात. दूसरे असे की, वधूपित्याच्या एकूण मालमत्तेचा आणि धनदौलतीचा हिशोब वरपिता कधी करतो? आणि त्यातील मुलीचा हिस्सा किती आहे हे कधी व कोणत्या काजीला किंवा मुफ्तीला विचारून ठरवितो? वारशातील हिस्स्याएवढीच हुंड्याची रक्कम मागीतली जाते काय? हुंडा मागण्यापूर्वी वधूपिता मरण पावलेला असतो काय? या सर्व प्रश्नांची उत्तरे जरी होकारार्थी असतील, तरी आणखीही मुद्दे विचारात घेण्यायोग्य आहेत. हुंडा घेण्यालाच पवित्र कुरआनात विरोध असल्यामुळे त्यास शरीयतमध्ये कोणतेच स्थान नाही. त्यामुळे मुलीच्या वारसाहक्कातील हिस्सा हुंड्याच्या नावावर वसूल करण्याचा वरपित्याला कोणताही अधिकार नाही. मुलीच्या बापाच्या मृत्यूनंतर वारसाहक्कानुसार मुलीला काही मिळाल्यास ते मुलीचे वैयक्तिक धन म्हणजे स्त्रीधन असते. या स्त्रीधनातून कोणालाही, अगदी भाऊ, बहिणी किंवा पतीला एक पैसुद्धा घेण्याचा अधिकार नाही. अशा परिस्थितीत या स्त्रीधनातून मुलीच्या सासुरवाडीचे घर भरणे हे तर शरीयतच्या अगदी विरुद्ध आहे. म्हणून हुंड्याच्या प्रथेचे उपरोक्त युक्तिवादाने समर्थन करता येणार नाही. असे समर्थन करून हुंडा उकळणे शरीयतची थट्टा होईल. अशा दुर्बुद्धीपासून वाचण्याची सुबुद्धी ईश्वराने आम्हा सर्वांना द्यावी.

## (१६) इस्लामी शरीयतशी (न्यायशास्त्राशी) बंडखोरी

इस्लामी पद्धतीच्या विवाहात महरचे किती महत्त्व आहे यावर प्रकरण दोनमध्ये प्रकाश टाकण्यात आला आहे. महर देण्यापूर्वी जर पतीचे निधन झाले, तर पतीने मागे ठेवलेल्या मालमत्तेतून पत्नीचे महर प्रथम द्यावे लागते. याबाबतीतही प्रकरण दोनमध्ये चर्चा करण्यात आली आहे. यावरून स्त्रियांचे हक्क कोणत्याही परिस्थितीत डावलणे इस्लाम सहन करत नाही, ही बाब स्पष्ट होते. इस्लामी न्यायशास्त्राचा हा मूलभूत सिद्धान्त आहे.

इस्लामी न्यायशास्त्राचा हा मूलभूत सिद्धान्त अस्तित्वात असताना, स्त्रियांचे हक्क डावलून फक्त पुरुषांचे लाभ विचारात घ्यावेत, या बाबीस कोणताही वाव राहत नाही. अशा प्रकारचे धारिष्ठ्य करणे, खरे पाहता इस्लामी शरीयतशी (न्याय शास्त्राशी) बंडखोरी करणेच आहे. स्त्रियांचा महर जर काही शेकड्यांत असेल तर पुरुषांचा हुंडा किमान दहा हजार ते लाखो रुपयांपर्यंत असल्याचे आढळते. स्त्रिचा महर मागितल्यासच मिळतो किंवा महर कधीकधी दिलाही जात नाही. (कारण सहसा स्त्री पतीकडे महर मागत नाही) तथापि पुरुष आपली हुंडारुपी किंमत (जिला शरीयतमध्ये अजिबात स्थान नाही) वरात निघण्यापूर्वी रोख वसूल करतो. हुंडा वसूल करणारे हे लोक विवाहासारख्या मंगलप्रसंगीसुद्धा ईश्वराच्या शरीयतशी बंडखोरी करण्याचे धाडस करतात, जणू काही या बाबतीत अशा लोकांवर ईश्वराने कोणतही कायदेशीर बंधन घातलेले नाही. शरीयतनुसार विवाहात महरची अट निश्चित केलेली असूनसुद्धा तिला एनकेन प्रकारे हरताळ फासला जातो. याउलट हुंडा उकळणे शरीयतविरोधी असतानासुद्धा, विवाहाआधी हुंड्याची रक्कम निश्चित करून ती रक्कम विवाहाअगोदर वसूल करणे हे दुष्कृत्य इस्लाम आणि शरीयतची केवळ साधी थट्टा नसून ती गुन्हेगारी स्वरूपाची थट्टा आहे. ही दुष्कृत्ये विचारात घेतल्यास, पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ज्या विवाहास "माझी परंपरा" असे ठरविले आहे तोच हा विवाह काय, असा प्रश्न पडतो.

प्रकरण ८

# सुधारक आणि व्यवहारी उपाययोजना

## १. हुंडा प्रतिबंधक उपाययोजना

भारतीय मुस्लिम समाजात प्रचलित असलेला 'जहेज'चा दुसरा प्रकार म्हणजे हुंड्याच्या प्रथेतील दोष समोर आल्यानंतर त्याबाबत चिंतन करून असे उपाय योजले जावेत, जेणेकरून हुंड्याच्या या लज्जास्पद प्रथेचे मुस्लिम समाजातून समूळ उच्चाटन व्हावे.

## २. विद्वानांची जबाबदारी

सन्माननीय विद्धान आणि प्रतिष्ठित मुफ्ती यांनी हुंडा घेऊन केलेल्या विवाहात शरीयतच्या दृष्टीने कोणते दोष, दुर्गुण आणि दुष्परिणाम आहेत हे दाखवून लोकांना सावध करावे आणि त्यांचे प्रबोधन करावे. त्या त्या विद्धानांनी आपल्या प्रभावक्षेत्रातून या अनिष्ट प्रथेला मूठमाती देण्याचा प्रयत्न करावा.

## ३. स्त्रियांमध्ये जागृती निर्माण करण्याची आवश्यकता

हुंड्याची कुप्रथा स्त्रियांसाठी लांच्छनास्पद आहे. त्यासंबंधी स्त्रियांमध्ये जागृती निर्माण करणे आवश्यक आहे. त्यासाठी खास स्त्रियांसाठी असलेली वर्तमानपत्रे, मासिके आणि नियतकालिकांमधून या विषयावर स्त्रियांचे लक्ष वेधले जावे. त्याद्वारे मुस्लिम तरूण मुलींमध्ये अस्मिता आणि सत्व प्रतिष्ठेच्या भावनेची जागृती केली जावी. तरूण मुलींनी अशा हुंडा मागणाऱ्या हरामखोर मुलाशी लग्न करण्यास स्वत:च नकार द्यावा, अशा तऱ्हेचे क्रांतिकारक विचार त्यांच्या मनामध्ये रूजवावेत अशा मुलींनी हुंडा न मागणाऱ्या सदाचारी विवाहित तरूणाशी विवाहबद्ध होण्यासही प्राधान्य देण्याची तयारी दाखवावी.

## ४. तरूणांमध्ये स्वाभिमान आणि स्वावलंबनाची भावना निर्माण करावी

आपल्या भावी पत्नीच्या बापास हुंड्याच्या रूपाने आर्थिक संकटात लोटून आपले घर भरण्यात आणि हुंड्याच्या रकमेतून छानछोकी करण्यात पुरुषत्व नाही, हे मुस्लिम तरूणांना दाखवून देण्यात यावे. अशा तऱ्हेने हुंडा घेऊन, आपल्या बापास छळणाऱ्या मुलाविषयी भावी पत्नीच्या जीवनसाथीच्या मनात खरे प्रेम निर्माण होऊ शकत नाही, हे तरूण मुस्लिम मुलांना पटवून देण्यात यावे. आपल्या मनगटाच्या जोरावर संपत्ती योग्य मार्गाने कमवून आपण आपल्या पत्नीस आणि सर्व कुटुंबास खूश ठेवल्यामुळे सर्व काही साधण्यात खरे पौरूषत्व आहे आणि त्यामुळे आपल्या भावी पत्नीच्या प्रेमाससुद्धा आपण पात्र ठरणार आहोत, हेही मुस्लिम तरूणांच्या मनात रुजणे आवश्यक आहे. अशा तऱ्हेने मुस्लिम तरुणांमध्ये स्वाभिमानाची स्वावलंबनाची, आणि जबाबदारीची भावना निर्माण करण्याचा कसोशीने प्रयत्न करण्यात यावा. जी व्यक्ती

आपल्या तरूण कन्यारत्नास आपली जीवनसाथी बनविण्यास तयार झाली, त्या व्यक्तीस मुस्लिम तरूणाने आपला उपकारकर्ता मानले पाहिजे. हुंडा घेऊन त्या उपकारकर्त्याच्या धनदौलतीवर दरोडा घालण्यात चारित्र्यहीनता, कृतघ्नता, शीलभ्रष्टता आणि धर्मभ्रष्टता आहे, हे मुस्लिम तरुणांना समजले पाहिजे, त्याची जाणीव त्यांना करून दिली पाहिजे. एकीकडे आपण इस्लाम आणि पैगंबर मुहम्मद (स.) यावर दृढ श्रद्धा असल्याचा दावा करीत असतो, दुसरीकडे इस्लामच्या तत्त्वज्ञानात बसत नसलेला हुंडा घेऊन अल्लाह आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याशी बंडखोरी करणे हा तर वास्तविक दांभिकपणा आहे. अशा तऱ्हेने बंडखोरी करून आपल्या दृढ श्रद्धेला आणि इस्लामला धोका निर्माण करीत असतो, याची स्पष्ट जाणीव विशेषकरून मुस्लिम तरूणांना आणि संबंधिताना करून दिली पाहिजे.

## ५. मुस्लिम संघटनांची जबाबदारी

मुस्लिमांचे प्रबोधन करणाऱ्या व्यक्ती, धार्मिक संघटना, सुधारणावादी मंडळे आणि चळवळी यांनी हुंड्याच्या अनिष्ट प्रथेतून मुस्लिम समाजाला सोडविण्याला प्राधान्याने महत्त्व दिले पाहिजे आणि शक्य तितक्या तत्परतेने या लांच्छानास्पद प्रथेतून मुस्लिम समाजास मुक्त करण्याचा जोरदार प्रयत्न केला पाहिजे.

## ६. धार्मिक संस्थांचे कार्य

देशातील मदरसे (धार्मिक विद्यालये) दारूल उलूम (धार्मिक विद्यापीठे) यांनी आपल्या अभ्यासक्रमात अशा बाबींचा समावेश केला पाहिजे, ज्यामुळे विद्यार्थ्यांच्या मनात हुंड्याच्या प्रथेविषयी इस्लामचा संपूर्ण दृष्टिकोन त्यांना माहीत व्हावा आणि या प्रथेविषयी त्यांच्या मनात तिरस्कार निर्माण व्हावा.

## ७. तात्कालिक हुंडाविरोधी सुधारक योजना

हुंड्याची प्रथा बंद करण्यासाठी काही तात्कालिक कडक योजना आखल्या जाव्यात. या सामाजिक रोगाचा उपचार केवळ नैतिक प्रवचनाने तत्काळ होऊ शकणार नाही. याबाबतचे सरकारी कायदे जनतेच्या सहकार्याशिवाय परिणामकारकरीत्या कार्य करू शकणार नाहीत. प्रत्येक मोहल्ल्यातील मशिदीशी त्या मोहल्लातील मुस्लिम बांधव निगडीत असतात. अशा मुस्लिमांची एक जमात तयार होते. मोहल्ल्यातील प्रत्येक मुस्लिमांच्या घरचे धार्मिक विधी या जमातीच्या सहकार्याने पार पाडली जातात. जो विवाह हुंडा घेऊन केला जात आहे, त्या विवाह सोहळ्यास कोणीही हजर न राहण्याइतपत मुस्लिम समाजात नैतिक संवेदना जागृत करण्यात यावी. सरकारी कायदे कार्यान्वित होऊन, हुंडा घेणाऱ्या गुन्हेगारांना शिक्षा देण्याइतपत सरकारी यंत्रणेस मदत केली जावी. मुस्लिम समाजाने अशी यंत्रणा तयार करावी.

## ८. मुस्लिम समाजाची बेपर्वाई विनाशक असेल

जर मुस्लिम समाजाने, विविध संघटनांनी आणि जबाबदार व्यक्तींनी, जे मुस्लिमांचे कल्याण करू इच्छितात, त्यांनी या हुंड्याच्या अनिष्ट प्रथेबाबतीत लक्ष दिले नाही, गप्प राहून बघ्याची भूमिका घेत राहिले, तर त्याची परिणती, ज्या भागातील मुस्लिम या लांच्छनास्पद प्रथेपासून सुरक्षित आहे, काही कालावधीनंतर तेही या प्रथेच्या विळख्यात सापडले जातील आणि ही समस्या उग्र स्वरुप धारण करील आणि मग त्यावरील उपाय आणखी कठीण होईल. ज्या भागात अद्याप ही प्रथा अस्तित्वात नाही तेथेही ती छुप्या मार्गाने हळूहळू पसरत जाईल. सद्यस्थिती येथपर्यंत पोहोचली आहे की, लोक आपल्या मुलाचा विवाहप्रस्ताव पाठविताना मुलीच्या बापाची आर्थिक परिस्थिती उत्तम असावी, अशी दक्षता घेत आहेत, जेणेकरून पहिल्या प्रकारच्या जहेजच्या प्रथेद्वारे (संसारोपयोगी साहित्य देण्याची प्रथा) जास्तीतजास्त साहित्य प्राप्त करता यावे, या पहिल्या प्रकारच्या प्रथेतून हुंड्याच्या प्रथेचा जन्म होऊ शकतो. म्हणून 'जहेज'च्या पहिल्या प्रकारासुद्धा इस्लामच्या तत्त्वज्ञानात आणि ऐतिहासिक परंपरेत स्थान नसल्याचे तमाम मुस्लिम समाजाच्या लक्षात आणून दिले जावे, जेणेकरून 'जहेज'ची पहिली प्रथासुद्धा अत्यंत मर्यादित राहील आणि अनिष्ट आणि लांच्छनास्पद, हुंडा प्रथेच्या मुळावर घाव घातला जाईल आणि हुंडा प्रथेचे मुस्लिम समाजातून समूळ उच्चाटन होईल अन्यथा याबाबतीत निष्काळजीपणा दाखविला गेल्यास संपूर्ण मुस्लिम समाज हुंड्याच्या अनिष्ट प्रथेने ग्रासला जाईल आणि देशात वेगाने पसरणाऱ्या लैंगिक अराजकतेच्या प्रवृत्तीपासून मुस्लिम समाजास आणि देशास सुरक्षितता अतिकठीण होऊन जाईल. ईश्वर अशा वाईट दिवसापासून सुरक्षित ठेवो.

**आमीन**

- समाप्त -